## 'Bee' यांचा अल्प जीवनवृत्तान्त

कविवर्य Bee यांचें व्यावहारिक नांव 'नारायण मुरलीधर गुप्ते' हें आहे. ते जातीनें चांद्रसेनीय कायस्थ प्रभु. Bee यांचा जन्म वऱ्हाडांत झाला व त्यांचें पुढील सर्व आयुष्यहि वऱ्हाडांतच व्यतीत झालें. तथापि त्यांचें घराणें मूळचें कुलाबा जिल्ह्यांतील 'शांघी' गांवचें होय. वाघी, पेण वगैरे पाच-सात गावांचें कुळकर्णीपण या घराण्याकडे असे.

Bee यांचे वडील कै. मुरलीधरपंत १८५१ च्या सुमारास वऱ्हाडांत आले. ते प्रथम सरकारी नोकरींत होते व पुढें वकिली करूं लागले. त्यांच्या पत्नीचें नांव राजूबाई ऊर्फ लक्ष्मीबाई असें होत. या दंपतीच्या उदरीं पांच मुलगे व तीन मुली जन्मास आलीं, त्यांपैकीं नारायण ऊर्फ Bee हे सर्वांत वडील. यांचा जन्म इ. स. १८७२ मध्यें वऱ्हाडांतील बुल्डाणा जिल्ह्यामधील मलकापूर नामक गावीं झाला. Bee यांचे वडील वकिलीनिमित्त यवतमाळ व वणी येथें राहात होते, यामुळें त्यांचें शिक्षण प्रथम यवतमाळास व पुढें उमरावतीस झालें. पण मुरलीधरपंत अर्धांगवायूनें अकस्मात् निधन पावल्यामुळें Bee यास मॅट्रिक न होताच सरकारी कारकुनाची नोकरी पत्करावी लागली.

Bee यांचा विवाह फार लहानपणीं वणीचे कै. मार्तंडराव प्रधान यांच्या मुलीशीं झाला. ही मुलगी लौकरच वारल्यामुळें त्यांचा दुसरा विवाह यवतमाळचे कै. गोविंद रावजी मुळे यांच्या मुलीशीं झाला. Bee यांच्या या द्वितीय पत्नीचें नाव सौ. लक्ष्मीबाई असें होतें. Bee यांना दत्तात्रेय नामक मुलगा व तीन मुली अशीं चार अपत्यें आहेत. सौ. लक्ष्मीबाई ११–४–१९३४ रोजीं अकोला येथें अर्धांगवायूनें निधन पावल्या.

नोकरीमुळें Bee यांना वाशीम, मूर्तिजापूर, अकोला इत्यादि गांवीं राहावें लागलें. पण त्यांच्या आयुष्याचा फार मोठा भाग अकोला येथेंच

व्यतीत झाला यामुळे Bee हे स्वतःस अकोलेकरच समजतात. ते अकोला येथें सेवानिवृत्त झाले धाकटे भाऊ व बहिणी यांचें शिक्षण, लग्न वगैरे सर्व भार Bee यानाच वाहावा लागला! त्याचे सर्वांत धाकटे भाऊ गजानन राव हे पुढें अध्यात्ममार्गाकडे वळले ते 'गजाननमहाराज' या नावानें विख्यात असून नाशिक येथें वास्तव्य करीत असत. ते नुकतेच समाधिस्थ झाले

Bee हे वयाच्या अठराव्या एकोणिसाव्या वर्षापासून काव्यलेखन करूं लागले त्याची पहिली कविता 'प्रणयपत्रिका' ही असून ती १८९१ मध्यें के हरिभाऊ आपटे यांच्या 'करमणूक' पत्रात मुद्रित झाली कांहीं काळ त्यानीं वर्तमानपत्रात गद्यलेखनहि केलें त्याची 'वेडगाणें' ही कविता १९११ मध्यें 'मनोरंजन' मासिकांत प्रसिद्ध झाली, त्या वेळेपासून Bee यांकडे रसिकांचं लक्ष वेधलें गेलें ही कविता 'Bee' याच टोपण नावाखालीं प्रसिद्ध झाली हें टोपण नाव कवीला त्याचे मित्र के शंकर विठ्ठल दीक्षित यानीं सुचविलें व कोणत्याहि नावाशीं याकडे नसल्यामुळे कवीनें ते स्वीकारलें! Bee याच्या बहुतेक कविता 'मनोरंजना' तूनच जगापुढें आल्या.

Bee याचा कवितासंग्रह 'फुलाची ओंजळ' या नावानें १९३४ मध्य प्रथम प्रकाशित झाला. हा संग्रह मुंबई व नागपूर विद्यापीठात मधून मधून लावण्यात येत असतो, असें दिसतें.

Bee हे अतिशय चारित्र्यवान् होते, ते सश्रद्ध होते पण कर्मठ नव्हते ते पराकाष्ठेचे प्रसिद्धिपराङ्मुख व निःस्पृह होते संस्कृत, इंग्रजी व प्राचीन मराठी काव्य वाङ्मयाचा त्यानीं गाढ व्यासंग केलेला होता

हे थोर कवि त्याच छिंदवाडा येथील जावई रा ब गा प्रधान याचे कडे आपलें उर्वरित आयुष्य व्यतीत करीत असता एकाएकीं हृदयक्रिया बंद पडून ता १६ ऑगस्ट १९४७ रोजीं अकस्मात् निधन पावले 'ईश्वर मृतात्म्यास शांति देवो!'

---

# अनुक्रमणिका

* * *

# सत्कार

परंतु भृंगा, तव गान
परमानंदें परिपूर्ण !

—केशवसुत

Bee हें अपूर्व पण मनोहर आणि यथार्थ इंग्रजी नामाभिधान धारण करून ज्यांनीं आपल्या अमृतमधुर गुंजारवानें 'मराठीचिये नगरी' मधील विचाराचे व कल्पनेचे कुंज कांहीं काळ निनादवून सोडले व तेथील रसिक रहिवाशांवर आपल्या गीतमाधुर्याची जबरदस्त मोहिनी घातली त्या प्रतिभाशाली कविश्रेष्ठाचा समग्र काव्यसंग्रह आज प्रथम प्रसिद्ध होत आहे हें पाहून मराठी कवितेच्या निःसीम भक्तांना अत्यंत हर्ष व आल्हाद वाटेल यात शंका नाहीं. विद्यमान कविवृंदात वयानें व गुणानीं जे ज्येष्ठ व आदरणीय कवि समजले जातात त्यांच्यामध्यें कविवर्य Bee यांचें स्थान निःसंशय थोर आहे. ते नावानें जरी 'B' असले तरी त्यांचें कर्तृत्व A 1 दर्जाचें आहे ही गोष्ट एखादा बालकवीहि कबूल करील. म्हणून त्यांच्या नावाचा व कृतीचा उल्लेख होतांच आधुनिक तरुण कवींच्या माना मुजऱ्यासाठीं खालीं लवतात. अशा श्रेष्ठ व अधिकारी कवीचा काव्यसंग्रह एकत्रित स्वरूपात रसिकांच्या हातीं आज पडत आहे ही गोष्ट वाङ्मयाच्या इतिहासात प्रामुख्यानें नमूद करून ठेवण्याइतकी महत्त्वाची आहे.

वास्तविक, या 'फुलांच्या ओंजळीं' त समाविष्ट झालेलीं सर्व कवनकुसुमें यापूर्वीच निरनिराळ्या वेळीं कवीनें महाराष्ट्रशारदेच्या चरणावर वाहिलेलीं असल्यानें त्यांचा परिमल सर्वांना परिचितच आहे. आता इतक्या वर्षांनीं हीं सर्व फुलें एका 'ओंजळी' त गोळा करून फिरून शारदेच्या

पायीं वाहिलीं जात आहेत ही गोष्ट कुणाला औपचारिक वाटली तरी आधुनिक मराठी कवितेच्या दृष्टीनें ती अत्यंत उपकारक व आवश्यक आहे आजकाल मराठीच्या काव्यवाटिकेंत कल्पकतेची थडी पडलेली असून तेथील झाडाझुडपांची पालवी व लतावेलींवरचा फुलोरा झडून गेला असल्यामुळें त्या वाटिकेवर एखाद्या उजाड आसाडीची अवकळा पसरलेली आहे वठलेल्या खोडाच्या तळवटी व पर्णहीन आणि अस्थिप्राय शाखांच्या सार्लीं रसिकांच्या काकडणाऱ्या झुडी केविलवाणे चेहरे करुन पडलेल्या आहेत. उपद्यापी टीकाकारानीं अधूनमधून पेटविलेल्या शेगोट्यांच्या आश्रयाला ऊबेच्या आशेनें उभे राहण्याचा कुणावर प्रसंग आलेला आहे, तर कुणाच्या या दुष्काळात कुणावर वाळलेला निर्जीव पाचोळाच हातात घेऊन हुंगीत बसण्याची पाळी आली आहे अशा दुःस्थितींत Bee कवींच्या गुंजारवाचा नाद जर रसिकांच्या कानीं पडेल तर त्या संगीताच्या जादूनें या शिशिरपीडित काव्यवाटिकेंत कांहीं काळ तरी पूर्वीच्या वसंतश्रीचें वैभव निर्माण झाल्या खेरीज राहणार नाहीं.

वयानें कविवर्य Bee हे जवळ जवळ केशवसुत, विनायक, रे. टिळक यांच्या पिढींत जमा होण्यासारखे असले, तरी काव्यनिर्मितिकालाच्या दृष्टीनें ते गोविंदाग्रज, रेंदाळकर, बालकवि ठोमरे, नागेश यांच्या कालखंडात समाविष्ट होतात याचें कारण म्हटलें म्हणजे त्यानीं आपल्या काव्यलेखनास, किंवा प्रकाशनास म्हणा हवें तर, फार उशिरा सुरुवात केली त्यांची पहिली कविता 'प्रणयपत्रिका' (पान ६) ही वऱ्हाडात चिखलदरा येथें ता १४ सप्टेंबर १८०१ रोजीं लिहिली गेली त्या वेळीं ते सुमारें ११ वर्षांच असावत ही कविता त्याच वर्षी कै हरिभाऊ आपटे यांच्या 'करमणूक' पत्रात प्रसिद्ध झाली खुद्द कवींना जरी ही आपली पहिली कविता आता 'ओबडधोबड' वाटत असली तरी त्या वेळीं ती हरिभाऊंना फारच आवडली त्या कवितेला 'मधुकर' नावाच्या कोणीं एका कवीनें त्याच पत्रात काव्यमय उत्तरहि दिलें होतें ही कविता १९२१ सालीं श्री विरकुड यांच्या 'महाराष्ट्र साहित्य' त पुनर्मुद्रित झाली वास्तविक मूळपासून Bee कवींचा गद्य लेखनाकडे अधिक ओढा होता त्यानीं आपल्या तरुणपणीं निरनिराळ्या वर्तमानपत्रातून टोपण नावानें पुष्कळस लेख लिहून प्रसिद्ध केले आहेत

१९०८ सालापर्यंत त्याचें हें गद्यालिखाण चालू होतें, तोंपर्यंत क्वचित् कुठें वर्तमानपत्रात त्याची एखादी दुसरी कविताहि प्रकाशित झाली असेल. १९०८ सालच्या सार्वजनिक अस्वस्थतेच्या व राजकीय धामधुमीच्या काळात वर्तमानपत्रात लेख लिहिणें हें पदरात विस्तव घेऊन फिरण्यासारखें होतें. Bee तर नोकरचाकर सरकारी नोकर. आजच्या सुधारलेल्या काळातदेखील केवळ एका कवितेनें भारी पगाराच्या अधिकारपूर्ण नोकरीचा निमिषार्धात निकाल लागू शकतो, तर त्या वेळीं परिस्थिति कशी ज्वालाग्राही असावी हें कल्पनेनेंच जाणलेले बरें. Bee कवींनीं आपल्या गद्यलेखणीला समजसपणें गवसणी घातली आणि तेव्हापासून अधिक उत्कटतेनें ते काव्यदेवतेच्या आराधनेला लागले, हें मराठी कवितेचें सुदैवच समजावयाला पाहिजे

१९११ सालीं Bee हें अभिनव नाव धारण करून त्यानीं "टला–ट रीला–री। जन म्हणे काव्य करणारी।" (पान ८) ही 'वेडगाणें' नांवाची एक अत्यंत नादमधुर व तात्त्विक कविता 'मासिक मनोरंजनां'त प्रसिद्ध केली. मराठी कवितेच्या प्रांतात Bee कवींचा हाच पहिला जाहीर पदविन्यास असें समजावयाला हरकत नाहीं. 'वेडगाणें' या एकाच गाण्यानें Bee कवींनीं महाराष्ट्रांतील रसिक वाचकाना वेड लावलें व आपल्या प्रतिभेच्या तेजस्वी विलासानें त्यांचे डोळे दिपविले. ही कविता वाचून कविश्रेष्ठ रे ना. वा टिळक हे तर इतके वेडावून गेले कीं, त्यांनीं उत्तरादाखल "To Bee" ही कविता तात्काळ 'मनोरंजना'त प्रसिद्ध केली व Bee कवींच्या प्रतिभेचें व काव्यगुणाचें सहर्ष अभिनंदन केलें. तथापि, ज्या एकाच कवितेमुळें Bee कवींचें नाव महाराष्ट्रांत सर्वतोमुखीं झालें व त्याच्या काव्यरीतींच्या कळसावर पताका चढविली गेली, ती कविता 'कमळा' ही होय 'घोरातांच्या पाक कुळीं जन्माला' आलेल्या कमळेच्या तेजस्वी जीवनाची Bee कवींच्या रसाळ रसवंतीनें रंगविलेली कहाणी वाचून ज्याच्या अंत करणाला पाझर फुटले नाहींत असा या डोंगरपठाराच्या महाराष्ट्रांत, किंवा गोविंदाग्रज म्हणतात त्याप्रमाणें या 'दगडाच्या देशा'त, एकहि पत्थर त्या वेळीं उरला नसेल अर्थातच, या काव्याचा महाराष्ट्रानें मुक्तकंठानें जयजयकार केला. इतका जयजयकार होण्याचें भाग्य तत्पूर्वी गोविंदाग्रजाच्या 'राजहंस' या शोकगीतालाच फक्त लाभलें होतें. १९११

ते १९२३ पर्यंत, म्हणजे सुमारें एक तपभरच, Bee कवींची प्रतिमा 'फुलीं फुलून' आली असें म्हणता येईल त्याच्या स्फुट कविता 'मासिक मनोरंजन', 'विविधज्ञानविस्तार', 'महाराष्ट्रसाहित्य' इत्यादि नियत-कालिकांतून वेळोवेळीं प्रसिद्ध झाल्या. क्वचित् प्रसंगीं एखादुसरी कविता काव्यसमाहारात्मक ग्रंथातून स्वतन्त्रपणेंहि प्रसिद्ध झाली आहे.

प्रस्तुत कवितासंग्रहांत अंतर्भूत होत असलेल्या ३८ कवितांशिवाय इतरत्र पूर्वी प्रसिद्ध झालेल्या पण आता या संग्रहात समाविष्ट न केलेल्या अशा सुमारें दहा कविता असूं शकतील म्हणजे Bee कवींच्या एकंदर स्फुट कवितांची संख्या अर्धशतकाच्या आतच आहे इतक्या थोड्या कविता लिहून ज्यांनीं थोर यशाचा वांटा मिळविला आहे असे मराठी वाङ्मयात Bee आणि बालकवि ठोमरे एवढेच दोन कवि उल्लेखितां येतील शब्दकोशाच्या आकाराशीं स्पर्धा करण्याइतकी आजकालच्या कित्येक काव्यग्रंथाची जाडी असते, त्यामुळें पानांच्या संख्येवरून एखाद्या कवीचें महत्त्व ठरविण्याकडे सामान्य वाचकाची प्रवृत्ति झालेली दिसून येते तसें पाहिलें तर बाभूळ्या किंवा चिंचेच्या झाडांना गुलाबाच्या रोपट्यापेक्षा किती तरी पटीनीं अधिक पानें असतात! पण निव्वळ पर्णसंभारापेक्षां सुगंधोत्कटते वरच वनस्पतीची किंवा काव्याची किंमत ठरत असते. रात्रीच्या वेळीं एखाद्या डोंगरावर पेटविलेल्या वणव्याच्या दीर्घच दीर्घ रेषेप्रमाणें एखाद्या कवीच्या पानेंच्या पानें पेटलेल्या प्रतिभेचा लांबलचक विस्तार पाहून कोणाला आश्चर्य किंवा फार झालें तर कौतुक वाटेल, पण त्या भडक्याच्या उजेडानें कोणाचे डोळे दिपणार नाहींत! विद्युल्लतेप्रमाणें निमिषमात्र झळाळून आपल्या प्रभेनें व कडकडाटानें जगाला जागें करण्याचें व दिपविण्याचें काम प्रतिभाशाली कवीच्या चार तेजस्वी ओळींनींहि होऊं शकतें, हें सत्य Bee कवींच्या बाबतीत पूर्णपणें प्रत्ययास येतें उरलेल्या काव्यांशिवाय Bee कवींची अप्रकाशित अशी कविता आतां मुळींच उरलेली नाहीं खंडकाव्येंहि लिहिल्याच्या ऐकिवात ते पडले नाहींत

होता तेवढा झाला नाहीं किंवा त्याच्या यशोदुंदुभीचा निनाद जेवढ्या मोठ्यानें दुमदुमावयाला पाहिजे होता तेवढा दुमदुमला नाहीं ही गोष्ट जरी खेदकारक असली तरी सत्य असल्यामुळें ती कबूल करावयाला हवी Bee कवींच्या पायापाशीं बसण्याची देखील ज्याची योग्यता नाहीं अशा अनेक काव्यकाराच्या पायावर महाराष्ट्रानें यापूर्वी डोकें ठेवलेलें आहे—अशा पद्यकाराचें सार्वजनिक प्रतिमापूजन महाराष्ट्रानें भक्तिभावानें केलें आहे—ज्याच्या स्तुतिस्तोत्राच्या लांबलचक माळा महाराष्ट्रातल्या प्रमुख वर्तमानपत्राच्या स्तमामधूनहि वारंवार फडकलेल्या आहेत एवढेंच काय, पण अशा वृत्तबद्ध गद्यलेखकापैकीं काहींना साहित्यसंमेलनाच्या व्यासपीठावर अध्यक्षाच्या आसनीं देखील सन्मानानें कित्येकदा प्रस्थापित केलें गेलेलें आहे मराठी मासिकातून आजपर्यंत कितीतरी कवींच्या कृतींबद्दलचीं गौरवपूर्ण परीक्षणें किंवा समीक्षणें आलेलीं असतील, काव्यचर्चेचे किती तरी प्रबंध अगर ग्रंथ आजपर्यंत प्रसिद्ध झालेले असतील, पण Bee कवींचा या सर्व लिखाणात चुकूनदेखील उल्लेख झालेला आढळावयाचा नाहीं जणू काय सर्व टीकाकारानीं किंवा पत्रकर्त्यांनीं Bee कवींना किंवा त्याच्या काव्यांना वाळींत टाकण्याचा मुद्दाम कटच केलेला आहे! सुदैवानें, असा खरा प्रकार नाहीं हें मला माहीत आहे पण तिऱ्हाईतपणें पाहणाराची क्षणभर तरी तशी समजूत झाल्याशिवाय राहणार नाहीं यात शंका नाहीं उदाहरणार्थ, 'आधुनिक कविपंचक' हें पुस्तक पाहा त्या पुस्तकाच्या त्या वेळीं पोरसवदा असलेल्या लेखकानें विष्णुशास्त्री चिपळूणकराच्या 'कविपंचका' शीं प्रास जुळविण्याच्या हव्यासानें केवळ पाचच कवींच्या काव्याची पाचवी पुजण्याचें ठरविलें व Bee कवींना आपल्या कक्षेतून अजिबात वगळलें मृत कवींच्याच काव्याचा गौरव करण्याचा आपला उद्देश होता असें जर त्या ग्रंथकाराचें या आक्षेपाबद्दलचें स्पष्टीकरण असेल तर मग त्यानें आपल्या स्वतःच्या जीवनमृत काव्याचा अंतर्भाव त्या पुस्तकात का केला नाहीं हा प्रश्न निरुत्तर राहतोच तसेंच, विदर्भदेशीय साहित्याचा व साहित्यकाराचा स्वतंत्रपणें सत्कार करण्याचीं आज साधनें उपलब्ध असताना व तसें करण्याचे आजपर्यंत अनेक प्रसंग आले असताना ह्या पर्वणीमध्यें विदर्भवासी Bee कवींच्या काव्याला फारसें पुण्य आल्याचें आजपर्यंत आढळून येत नाहीं

Bee कवींसंबंधीं दिसून येणाऱ्या या दीर्घ उपेक्षेच्या काळात समाधानाची गोष्ट अशी कीं, श्री वामन नारायण देशपांडे, श्री एम् आर देशपांडे व श्री श्री गो देशपांडे या तीन रसिक देशपांडे लेखकांनीं अनुक्रमें 'रत्नाकर', 'विस्डोमिअन् (इंग्रजी)' व 'नवजीवन' या मासिकांमधून Bee कवींच्या काव्यासंबंधीं स्वतंत्र गौरवपूर्ण टीकात्मक समीक्षणें *लिहिलीं व त्यांच्या काव्याचा यथोचित सत्कार केला, याबद्दल* त्या तिघांचें खरोखरच अभिनंदन करावयाला पाहिजे विशेषतः 'रत्नाकर' मासिकात (वर्ष ४, अंक २ व ३) 'फुलाची ओंजळ' याच मथळ्याखालीं श्री वामनराव देशपांडे यांनीं Bee यांच्या काव्याचें जें मार्मिक विश्लेषण व गुणसमालोचन केलें त्याचा या ठिकाणीं उल्लेख केल्यावाचून *मला राहवत नाहीं Bee कवींचे पहिले रसिक टीकाकार या नात्यानें* रा. वामन नारायण देशपांडे यांचें नांव मराठी वाङ्मयांत नमूद व्हावयाला पाहिजे.

Bee यांच्या काव्याकडे दुर्लक्ष होण्याचें दुसरें कारण असें असावेंसें मला वाटतें त्यांची कविता रे. टिळक, गोविंदाग्रज, बालकवि या केशवसुतांच्या सांप्रदायिकांशीं समकालीन असल्यामुळें तिच्या स्वतंत्र प्रथेची आणि *पद्धतीची कल्पना अंध टीकाकारांना व सामान्य वाचकांना होण्यासारखी* नव्हती सात शतकापूर्वी मराठी भाषेच्या दुर्नियंत ज्ञानेश्वरासारख्या 'नव्या बंडवाल्या' नें जो क्रांतीचा झेंडा उभारून ठेविलेला आहे, त्याचा मागोवा घेत केशवसुतादिक मंडळी आपापल्या फौजा घेऊन जशी गेली, त्याप्रमाणें *Bee हेहि स्वयस्फूर्तीनें व आत्मप्रेरणेनें गेले असावेत या शक्यतेचा कोणीं पारसा विचार केलेला दिसत नाहीं* पाठीवर 'निशाण' बांधून एका हातानें 'गोफण गुंडा' भिरकावीत व दुसऱ्या हातानें 'तुतारी' फुंकीत 'नव्या युगाचे शूर शिपाई' केशवसुत धडाडीनें पुढें चालले होते, तर त्यांच्या मार्गांशीं समांतर असलेल्या दुसऱ्या वाटेनें, किंवा *Bee कवींच्या शब्दांत सांगायचें तर प्राचीन पिढीनें घालून दिलेल्या लोकप्रगतिपर* 'पंथराजा' नें, क्रांतीचा डंका वाजवीत, ते भारतवर्षाच्या क्षितिजावर लौकरच अवतीर्ण होणाऱ्या महाकवींच्या स्वागताला सामोरे चाललेले होते डंक्याच्या गंभीर निनादानेंच तुतारीचा गगनभेदी तारस्वर अधिक प्रभावशाली असतो

हा व्यवहारातला अनुभव आहे. त्यामुळें केशवसुताच्या ' तुतारी ' चे पडसाद महाराष्ट्राच्या दऱ्याखोऱ्यांतून देखील घुमूं लागले व त्या वेळीं जो जागा झाला तो तडक केशवसुताच्या निशाणाखालीं धावत जाऊन दाखल झाला. स्वतंत्र सेनापतित्व मिळविण्याचें ज्याच्या अंगीं सामर्थ्य होतें असा गोविंदाग्रज, बालकवि इत्यादि विक्रमशाली सैनिकांनींहि मोठ्या अभिमानानें केशवसुताचें शिष्यत्व पत्करलें. Bee कवि हे स्वतंत्र प्रजेचे एकांडे धारकरी असल्यामुळें मागून येणाऱ्या अनुयायांची त्यांनीं वाटहि पाहिली नाहीं व पारखी पर्वाहि केली नाहीं. तत्त्वतः, केशवसुताच्या 'तुतारी'च्या सुरांशीं Bee च्या ' डफ्या ' चे निनाद जुळत असल्यानें लांबून ऐकणारांनीं आपल्या कल्पनेनें Bee कवींना केशवसुताच्या पलटणींत दाखल केलें. या अशा समजुतीनें केशवसुताच्या कार्याचा गौरव होत असला तरी त्यामुळें Bee कवींच्या लौकिकाला थोडा तरी बाध येतोच हें विसरून कसें चालेल ? अर्थात् हें सारें विवेचन कालक्रमानुसार केलेलें नसून या दोन कविश्रेष्ठांच्या काव्यांच्या दिशा लक्षात घेऊन केलेलें आहे. Bee कवींच्या कवितांचा काळजीपूर्वक अभ्यास करणाराला त्यांच्यावर केशवसुतांच्याच काय पण कोणत्याहि समकालीन कवींच्या काव्याचा सुतराम् देखील संस्कार झालेला नाहीं हें कळून येईल. त्यांच्या भाषेची सरणी व विचारांची घाटणी लक्षात घेतली तर त्यांच्या कवितेवर संस्कृत वाङ्मयाच्या अध्ययनाचा, ज्ञानेश्वर, मुक्तेश्वर, तुकारामादि प्राचीन संतकवींच्या परिश्रमपूर्वक केलेल्या परिशीलनाचा, तसेंच पोवाडे, पदें व लावणी इ. पूर्वकालीन वाङ्मयाच्या अभ्यासाचा विशेष परिणाम झाल्याचें आढळून येईल. तसेंच, त्यांच्या कवित्वाच्या उपासनेला इंग्रजी वाङ्मयाची मदत, केशवसुताच्या इतकी नव्हे, पण बरीच झालेली असली तरी कविता करण्याची मूळ स्फूर्ति त्यांना संतकवींच्या ओवीवाङ्मयातून मिळालेली आहे. प्राचीन संतवाङ्मयाशीं, त्यातील भाषेशीं अगर विषयांशीं केशवसुतांचें मुळींच सख्य नव्हतें ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे केशवसुतांपेक्षां त्यांची कविता अगदीं भिन्न आहे; किंबहुना तांबे व चंद्रशेखर यांच्या कवितेप्रमाणेंच Bee यांच्या कवितेला स्वतंत्र अस्तित्व आहे ही गोष्ट कळून येईल. सारांश, तात्कालिक लोकप्रिय रहदारीचा मार्ग Bee कवींनीं अनुसरला नाहीं म्हणून टीकाकारांनीं त्यांच्याकडे दुर्लक्ष केलें. त्यांना

फारसेच काय पण कोणीहि अनुयायी अगर शिष्य न मिळाल्यामुळें आणि त्याचा स्वतंत्र पंथ अगर परंपरा निर्मणें शक्य नसल्यामुळें चव्हाट्यावरच्या गाजावाजाचा लाभ त्याना झाला नाहीं.

तसें पाहिलें तर Bee कवींचा एकमार्गी आयुष्यक्रम, थोडासा एकलकोंडा स्वभाव व प्रसिद्धिपराङ्मुख वृत्ति या गोष्टी त्याच्या लौकिक कीर्तिप्रसाराच्या आड काहीं कमी आल्या नसतील! त्याच्या वयाचा महत्त्वाचा सर्व भाग अकोला येथें गेला. सरकारी नोकरीव्यतिरिक्त इतर कोणत्याहि व्यवहारांत ते कधींच पडले नाहींत. वाङ्मयाच्या व्यासंगाखेरीज त्यांनीं दुसरा कोणताहि कधीं उद्योग केला नाहीं. कवितालेखनाशिवाय इतर कोणत्याहि आनुषंगिक वाङ्मयव्यवसायांत किंवा चळवळींत त्यांनीं प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष भाग घेतला नाहीं. समकालीन कवींपैकीं गोविंदाग्रज, बालकवि ठोमरे व नागेश या तीनच कवींबद्दल त्याना अत्यंत आदर वाटत होता हें त्या कवींसंबंधीं त्यांनीं आपल्या काव्यात केलेल्या गौरवपूर्ण उल्लेखावरून दिसून येतें (पानें २, ५९ व ६१). नागेश कवींना त्यांनीं 'काव्यविटपारूढ कोकीळ' अशा सन्मानानें संबोधलें असून, 'आहे ती रुचिरा निसर्गमधुरा नागेश-वागीश्वरी' अशी त्यांच्या काव्याची प्रशंसा केलेली आहे. बालकवि ठोमरे याना तर 'काव्यगगनागणगत अति विमल तारा' अशा अत्युत्कृष्ट स्तुतिवचनानीं वाखाणिलें आहे. त्यावरून बालकवींसंबंधीं त्याना अतिशय जिव्हाळा वाटत असावा असें दिसून येतें. तथापि, या तीन कवींशीं देखील Bee कवींची प्रत्यक्ष ओळख होती किंवा नाहीं, निदान त्याचा पत्रव्यवहार तरी त्यांच्याशीं कधीं झालेला होता किंवा नाहीं यावद्दल मला शंका आहे. गोविंदाग्रजाना पाहण्यासाठीं ते एक दिवस मुंबईहून मुद्दाम पुण्यास आले होते. ही गोष्ट Bee याच्या एकंदर आयुष्यक्रमात अपवादभूत म्हणूनच गणली जाईल सारांश, Bee कवींची कोणत्याहि समकालीन कवींशीं ओळख नव्हती अगर कोणाहि प्रसिद्ध साहित्यिकांशीं अगर टीकाकाराशीं त्याचें कधीं रहस्य जमलें नव्हतें, म्हणून साहित्यकाराच्या वार्षिक संमेलनात किंवा भेटीगाठीच्या आणि चर्चेच्या प्रसंगीं त्यांच्याशीं असलेल्या परिचयाचा, अनुभवाचा अगर आठवणीचा कधींच बोलावाला झाला नाहीं. यामुळें एका बाजूनें त्याच्या कवितांचा नावलौकिक जितका व्हावयाचा

होत गेला, तितकीच दुसऱ्या बाजूनें त्याच्या व्यक्तित्वाची जाणीवहि बुजत गली Bee कवींचें व्यावहारिक नाव श्री नारायण मुरलीधर गुप्ते आहे ही गोष्ट आजच्या पिढीला जितकी अज्ञात आहे तितकीच ती त्याच्या काव्यनिर्मितीच्या ऐन बहारीच्या काळींहि त्याच्या पुष्कळ समकालीन कवींना आणि वाचकांना अज्ञात होती Bee कवींची कविता आत्मलक्षी नसल्या मुळें तिच्यात आत्मचरित्रपर असे उल्लेख कोठेंहि आलेले नाहींत 'विमा–विमला आपटे–प्रधानाच्या' (पान १८) या ओळीवरून पार झालें तर कवीच्या शेजाराला राहणाऱ्या काहीं कुटुंबांचीं आडनावें आपटे व प्रधान असावींत एवढाच तर्क संभवू शकेल पण याशिवाय त्याच्या कवितेवरून त्याच्या आयुष्यक्रमाचा किंवा नावागावाचा तिऱ्हाइताला पत्ता लागणें कालत्रयींहि शक्य नाहीं आजकाल पुष्कळ 'कविलोग' टोपण नावाचें अवगुंठन घेऊन मुद्रणसृष्टींत प्रवेश करतात पण बहुतेकांचे बुरखे ते जिथें पाटायला किंवा विरळ दिसायला नकोत तिथें म्हणजे नेमके तोंडावरच फाटलेले असतात यामुळें बुरख्याचा तोंडावरील भाग वर करून रस्त्यानें चाललेल्या नोहऱ्याच्या बायकाप्रमाणें बहुतेक टोपण–नामधारी कवींची स्थिति असते स्वतःचीं खरीं नावें प्रकट करण्यास ही मंडळी इतकी उत्सुक असतात कीं, टोपण नावाचा फार्स निव्वळ नावापुरताच केलेला असतो असें म्हणण्याची पुढें पाळी येते Bee कवींच्या नावाचें गौप्य दीर्घकालपर्यंत जितकें कसोशीनें राखलें गेलें तितकें दुसऱ्या छद्मनामधारी लेखकाचें रहस्य क्वचितच पाळलें गेलें असेल "तुमचें नाव काय तें सांगा" अशी Bee कवींना कोण्या रसिकानें विचारणा केली (पान १) तेव्हां त्यानीं काव्यातच त्याला उत्तर दिलें कीं, "आकाशात चमचमणाऱ्या असंख्य नक्षत्रांचा विलास आपल्या मनाला मोहिनी घालतो किंवा रानात जाणाऱ्या लोकांचें तेथील प्रसूनान्वित तरुलताच्या उन्मादक सुगंधानें भान हरपतें, तरीदेखील आपण त्या नक्षत्राचीं अगर फुलांचीं नावें विचारावयाला जात नाहीं नावाची मोहनी सामान्य माणसाच्या मनावर असते काव्यरसात जर रसिक खरा रंगला असेल किंवा तल्लीन झाला असेल तर त्याला कवीचें नाव विचारण्याची शुद्धहि राहात नाहीं! मग तुम्ही मला नाव सांगण्याचा विनाकारण आग्रह कां करिता?" असा लाजाळूच्या पानाप्रमाणें Bee कवींचा

लाजरा व हळुवार स्वभाव आहे. आजकालच्या स्वयंप्रसिद्धीच्या व आत्म घोषणेच्या काळात Bee कवींसारखे पुराणवृत्तीचे पुरुष हे आश्चर्याचाच विषय ठरावयाचे. Bee कवींचा फोटो या संग्रहात प्रथमच प्रसिद्ध होत आहे, तो देखील महत्प्रयासानें प्रकाशकानीं त्यांच्याकडून मिळविलेला आहे हें उघडच आहे आपल्या मोहक सुवासानें सर्व वनप्रदेश दरवळून टाक णाऱ्या पण आपण मात्र स्वत एका दगडाआड दडून बसलेल्या लाजऱ्या फुलाला उद्देशून रे. टिळक यानीं जी एक सुंदर कविता लिहिली आहे ती जणू काय Bee कवींच्या जीवनक्रमाला व वृत्तीला अनुलक्षूनच लिहिलेली असावी असें मानलें तर त्यात चूक मुळींच होणार नाहीं अप्रसिद्धीच्या संरक्षक पडद्याच्या आड निर्वेधपणें गुंजारव करीत बसण्यातच Bee कवींना समाधान वाटतें प्रसिद्धीच्या हमरस्त्यावर बसून येणाऱ्याजाणाऱ्याची वर्दळ सहन करणें हें Bee याच्या नाजुक स्वभावाला कधींच मानण्यासारखं नव्हतें व नाहीं

सामान्य वाचकांत Bee याच्या काव्याचा प्रसार होण्यास आणखी एक अडचण आलेली असावी मागील पिढींत गेयतेच्या दृष्टीनें काव्याकडे कोणीहि पाहात नसे पोवाडे, लावण्या व पदें हा काव्याचा अत्यल्प भाग वजा केला तर बहुतेक सर्व प्राचीन मराठी काव्य हें निव्वळ पद्यच आहे— गेय नाहीं. केशवसुत, टिळक, गोविंदाग्रज याच्याहि काव्याची मोठी मदार ठराविक गणवृत्तावर व साधारणपणें गणपद्धतीनेंच गुणगुणता येण्यासारख्या मात्रावृत्तावरच होती आरोहावरोहाचा गोड चढउतार ज्याच्यात आहे अशा चटकदार व कर्णमधुर चालींचा या कवींनीं मुळींच उपयोग केला नाहीं असें म्हटलें तरी चालेल Bee याच्या कवितेचीहि स्थिति अशीच आहे त्याच्या काव्यरचनेचा सर्वात मोठा मक्ता शार्दूलविक्रीडित या वृत्ताला व ' चंद्रकांत राजाची कन्या ' या चालीवर दिलेला आहे, म्हणून आजच्या परिस्थितीच्या दृष्टीनें पाहता त्यांची कविता चटकन् कानात भरण्यासारखी किंवा ओठावर खेळण्यासारखी नाहीं कविता गेय असून जर ती भावदर्शक, विशेषेंकरून शृंगारविषयक किंवा वीरविषयक असेल तर तिची लोकप्रियता विलक्षण वेगानें वाढते. तांबे यांचें ' डोळे हे जुल्मि गडे । रोखुनि मज पाहुं नका ' हें लावणीच्या धर्तीवर रचलेलें भावगीत आजकाल इतकें लोकप्रिय होण्याच

कारण म्हणजे वर सांगितलेल्या या सर्व गुणांचा सुंदर मिलाफ त्या काव्यांत फार सहज रीतीनें झाला आहे, हें होय. 'चांफा बोलेना। चांफा चालेना। चाफा खंत करी। कांहीं केल्या फुलेना।' या Bee कवींच्या गीतातील सात्त्विक व नाजुक शृंगार, शब्दरचना अत्यंत सुंदर व सुलभ असूनहि, सामान्य माणसाच्या ज्ञानाच्या किंवा अनुभवाच्या आटोक्यापार आहे, व शिवाय त्या गीताची गेयता ही संदिग्ध स्वरूपाची असल्यानें तिच्या वाट्याला अशा तऱ्हेचें भाग्य येऊं शकलें नाहीं. लोकाभिरुचीला बळी पडून ठराविक ठशाच्या आणि लालभडक रंगाच्या 'ऐतिहासिक' कविताहि Bee कवींनीं लिहिल्या नाहींत किंवा आपुक-मापुकाच्या उन्मादक इष्काचीं शृंगारिक कारंजींहि त्यानीं आपल्या काव्यात बांधलीं नाहींत. त्यामुळें इतर काहीं कवींप्रमाणें Bee याच्या कवितेची पकड सामान्य माणसाच्या मनावर चटकन् बसत नाहीं; तशात स्वभावतःच त्याची कविता विचारप्रेरक व तात्त्विक स्वरूपाची आहे. *त्याच्या भाषेची घडण ही* कलापूर्ण असली तरी कठीणच आहे व त्यांतील सूक्ष्म कलेच्या व सौंदर्याच्या छटा सुलभतेनें प्रकट होण्यासारख्या नाहींत. तेव्हा सामान्य लोकप्रियतेच्या कसोटीवर घासून Bee कवींच्या काव्यगुणाची व महत्त्वाची खरी कल्पना होणें शक्यच नाहीं. खरें सागायचें म्हणजे Bee हे कवींचे कवि आहेत. अनेक कवींना स्फूर्ति पुरविण्याइतकें चैतन्य व तेज त्याच्या कवितेंत काठोकाठ भरलेलें आहे. मास्टर मोडकाच्या सुस्वर गायनालापानीं अगदीं पिटात *बसलेला माणूसहि नागासारखा डोलू लागतो*, तर *अल्लादियाखाच्या शास्त्रोक्त* गायनातील मख्खी कळण्यास श्रोत्याना पुष्कळच उंचीवर चढावें लागतें. Bee कवींच्या कलेचें रहस्यदेशील दर्दी कलावंताशिवाय इतराना कळणें अशक्य आहे. याच दृष्टीनें त्याच्या काव्याचें समालोचन करणें जरूर आहे.

Bee कवींच्या या संग्रहांतील ३८ कवितामध्यें जीवनविषयक तत्त्वज्ञानाचें त्यात निरनिराळ्या प्रकारानीं निरूपण केलें आहे अशा काव्याची सख्या अधिक आहे हें या संग्रहाकडे अगदीं वरवर पाहणारालाहि आढळून येईल. विचाराचे अत्यंत सूक्ष्म पापुद्रे हलक्या हातानीं उकलून आतील तत्त्वें विशद करून दाखविण्याचा त्याच्या बुद्धीला दाडगा व्यासग असल्यानें प्रासंगिक किंवा लौकिक महत्त्वाच्या विषयाकडे किंवा विविध वस्तूंच्या बाह्य

रुपाच्या वर्णनाकडे तिचें साहजिकच दुर्लक्ष झालेलें आहे त्यामुळें सकृद्दर्शनीं त्याच्या काव्यात वैचित्र्याचा अभाव आहे अशी जर कोणाची कल्पना झाली तर त्यात नवल नाहीं त्याची ऐसलनपद्धति आत्मलक्षी नसल्यानें संसारातील त्याच्या वैयक्तिक अनुभवाचें किंवा भावनाचें प्रकटीकरण त्याच्या काव्यातून झालें नसलें तरी सूक्ष्म अवलोकन, अखंड आत्मचिंतन आणि दीर्घ निदिध्यास याचा मंदार पर्वताप्रमाणें मथनदंड तयार करून त्यानीं आपला अथांग विचारसागर तळापासून घुसळलेला आहे आणि त्यातून बहुमोल तत्त्वाचीं आणि निष्कर्षाचीं रत्नें बाहेर काढलेलीं आहेत 'तत्त्वज्ञान' या शब्दाचा उच्चार केल्यानंतर सामान्य माणसाच्याच काय पण चांगल्या जाणत्या आणि समंजस मनुष्याच्या कपाळावर आठ्यांचें जाळें गोळा होतें आयुष्याच्या तत्त्वाचा खोलवर विचार करण्याची प्रवृत्ति सुखासक्तीच्या या आधुनिक काळातच काय पण अध्यात्मविषयक विचार ज्या वेळीं प्रकर्षाला पोहोंचले होते अशा प्राचीन काळींहि जनतेंत फारशी आढळून येत नव्हती 'तत्त्वज्ञानाचा अभ्यास करणें म्हणजे आपल्या मरणाचा रस्ता तयार करण्यासारखें आहे!' असें सिसेरो म्हणत असे, तर 'एखाद्या प्रांतातील लोकांना मला जबर शिक्षा करावयाची असेल तर तेथील राज्यकारभार मी तत्त्वज्ञाच्या हातीं देईन!' असें फ्रेडरिक द ग्रेटचें म्हणणें असे 'तत्त्वज्ञानानें बुद्धीचें समाधान झालें तरी कर्तबगारीचें कंबरडें मोडतें' असें दुसऱ्या एका प्रसिद्ध ग्रंथकाराचें वचन आहे या गोष्टींवरून मोठमोठ्या लोकांच्या मनांतहि तत्त्वज्ञानाबद्दल कसा तिरस्कार किंवा तुच्छता वसत असे हें कळून येण्यासारखें आहे पण तत्त्वज्ञानाच्या खऱ्या स्वरूपाचा व हेतूचा हा अज्ञानमूलक विपर्यास आहे. 'तत्त्वज्ञान ही जीवनाची कला आहे' या प्लेटोच्या विधानात तत्त्वज्ञानाच्या खऱ्या स्वरूपाचें दिग्दर्शन झालेलें आहे बुद्धिमत्तेचें व विचारशक्तीचें खरें प्रकटीकरण तत्त्वज्ञानातच होत असल्यानें मानवी प्रगतीचें व व्यापाराचें आकलन त्याच्यावाचून होणेंच शक्य नाहीं. आयुष्याचें रहस्य ज्यामुळें कळेल व प्रगतीचा मार्ग दिसेल असें जीवनाचें अर्थात उपयुक्त असलेलें तत्त्वज्ञान Bee कवीच्या काव्यात भरलेलें आहे —जीवनाची मीमांसा ज्यात केलेली आहे तें खरें काव्य, अशी जर काव्याची व्याख्या केली तर त्या व्याख्येच्या कसोटीला Bee कवींचें काव्य उत्कृष्ट रीतीनें उतरल्याशिवाय

राहणार नाहीं. प्रत्यक्ष आयुष्याशीं त्याचा काडीइतकादेखील संबंध नाहीं असें निरर्थक वृत्तबद्ध लिखाण म्हणजे काव्य, अशी जर कोणीं काव्याची व्याख्या केली तर ती आजकालच्या पुष्कळ कवींच्या कृतीला लागू पडेल. Bee हे नुसते Poet नसून ते Poet and Philosopher आहेत हें लक्षात ठेवावयाला पाहिजे. अतरिक्षाच्या पोकळींत स्वैर व अनिरुद्ध संचार करणाऱ्या विमानाप्रमाणें Bee कवींचें तत्त्वज्ञान केवळ वाऱ्यावर तरंगणारें किंवा भराऱ्या मारणारें नाहीं. लोखंडी रुळानें आखलेला मार्ग यत्किंचितहि न सोडता उद्दिष्ट स्थळाकडेच जाणाऱ्या आगगाडीप्रमाणे तें नियंत्रित व नियमबद्ध आहे. जीवनाशीं निगडित नसलेलें तत्त्वज्ञान हें दोरी तुटल्यामुळें आभाळात भिरकटणाऱ्या वावडीप्रमाणें असतें. तेव्हां तत्त्वज्ञानाची दोरी आपल्या हातात ठेवून तें आपल्यापासून फार दूर न जाईल याबद्दल आपण काळजी घ्यायला पाहिजे ही Bee कवींना जाणीव आहे. जगाच्या प्रगतीचा, मानवी उत्क्रांतीचा व समाजाच्या घटनेचा अत्यंत शास्त्रशुद्ध विचार Bee कवींनीं केलेला असून, त्या बाबतींत त्यांनीं आपल्या मनाशीं जे सिद्धान्त ठरवून ठेवले आहेत ते एखाद्या मिशनऱ्याच्या चिकाटीनें त्यांनीं आपल्या काव्यांत पुनरुक्ति पत्करूनहि पदोपदीं मांडलेले आहेत.

ज्या उदात्तमनोहर कवितेचें नाव या कवितासंग्रहास सार्थपणें दिलेले आहे, त्या 'फुलांची ओंजळ' या कवितेंत (पान ८४) हें विश्वचक्र कोणत्या ध्येयाकडे चाललेलें आहे हें कवीनें सांगितलें आहे. त्याचा असा पक्का विश्वास आहे कीं—

> पूर्णापासुनि ढळलेलें जग जाते पूर्णाकडे. (पान ८६)

पूर्णतेसंबंधीं देखील त्याच्या कल्पना निश्चित आहेत—

> आनंदाला म्लानपणा नच सौंदर्याला क्षय
> स्थलाकडे त्या जाताहे हें विश्वचक्र निर्भय. (पान ८७)

जिथें अवीट आनंद व सतेज सौंदर्य नांदत आहे तिथेंच पूर्णत्व संभवतें आणि हेंच सृष्टीचें किंवा जीवनाचें अंतिम ध्येय आहे. या ध्येयाच्या मार्गाची लांबण मोठी असून ती अत्यंत बिकट आहे. वाटेत अनेक वेडे-वांकडे चढउतार आहेत, त्यामुळें कधीं या सृष्टिचक्राचा तोल सुटून तें

भलतीकडेच करतें, तर कधीं तें वाटेंत लागणाऱ्या खत्तर खडकाळींत तें अडून नसतें जर कधीं तें एखाद्या उचस्थाच्या माथ्यावर पोहोंचलें तर तेथें साहजिकच असलेला प्रकाश पाहून आता आपण पूर्णत्वाप्रत पोहोंचलों अशी खोटीच भ्रांति त्याला होते व तें आनंदानें नाचू लागतें लांबून दिसणाऱ्या पाणथळीच्या खोट्या तेजोभासाला भुलून तें कधीं आडमार्गाला जातें व चिखलामध्यें रुतून नसतें, तर कधीं एकाच जागेवर तें स्वत च्याच भोंवतीं गरगर फिरत नसतें व त्यामुळें आपण किती तरी मोठा पल्ला गाठला असा त्याला खोटाच भ्रम होतो कसेंहि असलें तरी अंतिम ध्येय आपण गाठूंच गाठूं असा त्याला आत्मविश्वास असतो आणि म्हणून तें त्या बाबतींत निर्भय असतें

उत्क्रांति व विकास हा सृष्टीच्या प्रगतीचा किंवा पूर्णत्वाकडे पोहोंचण्याचा मार्ग आहे याची कवीला जाणीव आहे. सृष्टि ही 'नित्य विरामपरायण' आहे म्हणूनच तिची कालावर सत्ता आहे (पान ५१) जुन्याचें कलेवर टाकून सृष्टि नवीन होत असते 'वाढा आणि जगा' असेंच निसर्गाचें जगालाहि सांगणें आहे म्हणून पूर्णत्वाची कल्पनादेखील सापेक्ष अर्थानेंच घ्यावयाला हवी सृष्टिचक्र जरी अखेर पूर्णतेला पोहोंचलें तरी अनंत ब्रह्माण्डें निर्माण करणाऱ्या ब्रह्माण्डनायकाचा प्रचंड खटाटोप तेथेंच थांबतो असें थोडेंच आहे? ज्या क्षणीं पूर्णतेला आपण पोहोंचतों असें वाटतें त्या क्षणापासूनच पतनाला प्रारंभ होतो असा या सृष्टीचा *निठुर कायदा आहे त्याला इलाज नाहीं या कायद्याच्या कचाट्यातून* प्रत्यक्ष परमेश्वराची सुटका होत नाहीं कारण—

अगाध सृष्टिरचना सपेल त्याची जर
जाणा निश्चित का मरेल असला सपूर्ण तो ईश्वर! (पान ४३)

त्या च निर्माण केलेले नियम देवानें मोडले तर त्यालादेखील 'देवाचा' हार्दिक असें Bee कवींनीं आवेशानें सांगितलें आहे म्हणून पूर्णाच्या पलीकड जाण्याची देखील जरी सृष्टि प्रवृत्ति दाखवितें, तद्वत निसर्गानुसारी मानवानीं 'शताच्या कुपणावरून, उड्डाण करून' पूर्णाच्या पलीकड जाण्याचा प्रयत्न केला पाहिजे. *तरच त्यांना तेथील गूढें उकलता आणतील*

शक्य होईल. आता सत्यसृष्टींत हें शक्य होवो किंवा न होवो, पण अशा नलत्तर इच्छेनें जरी मन सविद्ध झाले तरी त्या मनःस्थितींतूनच नवीन नवीन शास्त्रें, कला व पराक्रम निर्माण होतात व त्यामुळें मानववंशाची प्रगति होते (पान ४३).

अर्थात् मानववंश हा हल्लीं बाल्यदशेंत आहे, तो अद्यापि पूर्णता पावलेला नाहीं, तथापि तो वाढीस मात्र खास लागला आहे अशी कवीला खात्री वाटत आहे. त्यामुळें मानवजातीच्या हातून जर काहीं चुका घडल्या तर त्यामुळें निराश होण्याचें काहींच कारण नाहीं. मनुष्यप्राणी हा जितका सामर्थ्यवान् आहे तितकाच स्खलनशील आहे हें सत्य Bee कवींनीं एका प्रसंगाच्या अनुरोधानें फारच उत्कृष्ट कल्पनेमध्यें व शब्दामध्यें मांडलेलें आहे —

अत्युत्कट उत्कर्ष गुणांचा, तज्जन्य स्खलन
मिळून अद्भुतरम्य मनुजता झाली निर्माण!
मृगलांछन त्या मानवतेचें परमरम्य चिन्ह
परधाम परमेश मौळिवर मिरवि अविच्छिन्न! (पान ४३)

मानवी स्खलनशीलतेचें इतकें सुंदर समर्थन आजपर्यंत कोणत्याहि कवीनें केलें नसेल!

उतारावरून वेगानें खालीं जाण्याच्या या नैसर्गिक प्रवृत्तीमुळेंच मोठमोठ्या संस्कृति व समाज अधोगतीला जातात या अवनतीच्या कर्दमात रुतलेला हा समाजाचा गाडा वर खेंचून काढण्याचें व त्याला प्रगतीच्या मार्गावर आणून सोडण्याचें काम क्रांतिकारक बंडवालेच करतात—

बंडाचें तत्क्षणिं उभवितो कालवेत्ता निशाण
जातां लोकप्रगतिपर या 'पथराजें' सुजाण. (पान ७१)

अर्थात् एखादें 'बंड' यशस्वी होण्यास तें राष्ट्रव्यापकच नव्हे तर विश्वव्यापक व्हावयाला पाहिजे! बंड यशस्वी झालें तरच तें कायदेशीर ठरतें व विजयी बंडवाला हा 'ना विष्णु पृथिवीपतिः' या न्यायानें परमेश्वराचा पृथ्वीवरील प्रतिनिधि ठरतो समाजात निर्माण झालेली विषमता व तज्जन्य

अन्याय निर्दाळून त्या ठिकाणीं समता स्थापन करण्यासाठीं विश्वव्यापी क्रांतीच घडवून आणावयाला हवी, असे आसुरी मार्गाचे अवलंब करणारे आजचे पाश्चात्य क्रांतिकारकदेखील प्रतिपादित आहेत. अर्थात् Bee हे समतावादी असले तरी अत्याचारी क्रांतिकारकांचे जबरदस्तीचे मार्ग त्यांना अभिमत नाहींत हें सांगण्याचीदेखील आवश्यकता नाहीं. 'प्रेमाच्या पायावर समतेची इमारत रचणारी शांतिमय उत्क्रांति' त्यांना हवी. निसर्गक्रमानुसार होणाऱ्या उत्क्रांतीची मंद गति त्यांना सहन होत नाहीं व ही गति वाढविण्याच्या हेतूनें जे मुद्दाम कृत्रिम तऱ्हेची क्रांति घडवून आणतात त्यांचे मार्ग व पद्धति Bee सारख्या शांतताप्रिय विचारवंतास केव्हांहि पसंत पडणें शक्य नाहीं. Bee कवींच्या कल्पनासृष्टींतले बंडवाले ज्ञानेश्वर किंवा महात्मा गांधी यांच्यासारखे प्रेमाच्या व शांतीच्या मार्गानें समाजात क्रांति घडवून आणणारे असे आहेत. मात्र, असली अनत्याचारी 'बडें' यशस्वी होण्यासाठीं तीं व्यापक प्रमाणावर व्हावयाला पाहिजेत असें मात्र त्यांचें ठाम मत आहे.

दारीं बंड ! घरांत बंड ! अवघें ब्रह्माण्ड बंडें भरे ! (पान २३)
*असें सर्व ब्रह्मांडाला हलवून सोडणारें बंड त्यांना हवें आहे.*

समाजाच्या उद्धारासाठीं वेळोवेळीं अवतरणाऱ्या या बंडवाल्या महात्म्याचा गौरव आणि जयजयकार Bee कवींनीं आपल्या 'डंका' (पान ३४) या ओजस्वी काव्यांत केलेला आहे. राष्ट्राच्या अवनतीच्या काळीं त्या ठिकाणीं जिकडे तिकडे दुहीच्या आगी लागतात, समाजात पावित्र्याचें *ढोंग फार माजतें, तत्त्वें नाहींशीं होतात व पोकळ औपचारिक विधींचें नमतें* अवडंबर माजतें; सामान्य म्हणून समजले जाणारे पुढारी अडाणी मुक्या जनतेला चरकात पिळून काढतात. क्षुद्र गोष्टींना किंमत येते व जिकडे तिकडे ल्वाडी बोकाळते समाजाच्या जीवनातून अप्रतिहतपणें वाहणारें आचाराचें व विचाराचें जल स्वार्थाच्या बंधाऱ्यामुळें अडून राहतें व सडतें—

जल सडलें तें निभ्रान्त
तरि धूर्त त्यास तीर्थत्व
देउनी माहती भोळे !

अशा वेळीं कर्तव्य, श्रेयस् व त्याग यांचें खरें स्वरूप काय तें कळत नाहीं. परंपरेची आंधळेपणानें पूजा करण्याची प्रवृत्ति वाढते. विचारशक्ति दुबळी होते, बुद्धि आंधळी बनते व त्यामुळें तिला आपला राणीपणा सोडून रूढीच्या पदरीं दासीचें काम करावें लागतें. 'आर्यांची परंपरा', 'संस्कृति', 'धर्म' व 'रूढि' यांचें राष्ट्रांत अतोनात थोतांड माजतें—

ही दंगल जेव्हां होते
नाकळेचि कोठुनि कीं तें,
येतात बंडवाले ते
ज्या हालें, 'स्वागत' बोलें !

ह्या बंडवाल्यांना मारून मुटकून निर्माण करावें लागत नाहीं. वर्षाकाळीं अचानकपणें आकाशांत अवतीर्ण होणाऱ्या पर्जन्यमेघांप्रमाणें वावटळीच्या वेगानें ते समाजांत अकस्मात् उत्पन्न होतात व त्यांचें 'स्वागत' करण्यास जग नेहमींच सज्ज असतें. स्वधर्माचा विसर पडल्यामुळें जेव्हां जेव्हा राष्ट्रपुरुषाला ग्लानि येते तेव्हा त्याला जागृत करून नवजीवन देण्यासाठीं प्रत्येक युगांत परमेश्वराचा अवतार निर्माण होत असतो, या गीतेंतील कल्पनेला अनुसरूनच ही बंडवाल्यांची कल्पना बसविलेली आहे, हें उघड आहे. पूर्वी महाराष्ट्रांत ज्ञानेश्वरमहाराजाच्या नेतृत्वाखालीं संतमंडळींनीं जें सामाजिक, धार्मिक व वाङ्मयात्मक बंड यशस्वी करून दाखविलें त्याचा Bee कवींनीं मोठ्या अभिमानानें उल्लेख केलेला आहे. त्या थोर स्वार्थत्यागी महात्म्यांनीं शांतीच्या मार्गानीं समाजाची उत्क्रांति घडवून आणली व प्रेमाच्या पायावर समतेची घटना करून आपलें सर्वस्व 'ब्रह्मार्पण' केलें—

आम्ही त्या दिलजानांचे
साथी—ना मेलेल्यांचे—
हे डंके झडती त्यांचे,
ऐकोत कान असलेले !

अन्याय निर्दाळून त्या ठिकाणीं समता स्थापन करण्यासाठीं विश्वव्यापी क्रांति घडवून आणावयाला हवी, असे आसुरी मार्गाचे अवलंब करणारे आवेश पाश्चात्य क्रांतिकारकांतील प्रतिपादित आहेत अर्थात् Bee हे समतावादी असले तरी अत्याचारी क्रांतिकारकांचे जबरदस्तीचे मार्ग त्यांना अभिमत नाहींत हें सांगण्याचीदेखील आवश्यकता नाहीं. 'प्रेमाच्या पायावर समतेची इमारत रचणारी शांतिमय उत्क्रांति' त्यांना हवी. *निसर्गक्रमानुसार होणाऱ्या उत्क्रांतीची मंद गति त्यांना सहन होत नाहीं* व ही गति वाढविण्याच्या हेतूनें जे मुद्दाम कृत्रिम तऱ्हेची क्रांति घडवून आणतात त्यांचे मार्ग व पद्धति Bee सारख्या शांतताप्रिय विचारवंतास केव्हांहि पसंत पडणें शक्य नाहीं. Bee कवींच्या कल्पनासृष्टींतले वेडवाले ज्ञानेश्वर किंवा महात्मा गांधी यांच्यासारखे प्रेमाच्या व शांतीच्या मार्गानें समाजांत क्रांति घडवून आणणारे असे आहेत. मात्र, असली अनत्याचारी 'बंडें' यशस्वी होण्यासाठीं तीं व्यापक प्रमाणावर व्हावयाला पाहिजेत असें मात्र त्याचें ठाम मत आहे.

दारीं वेड ! घरांत वेड ! अवघें ब्रह्माण्ड वेडे भरे ! (पान २३)
असें सर्व ब्रह्मांडाला हलवून सोडणारें वेड त्यांना हवे आहे.

समाजाच्या उद्धारासाठीं वेळोवेळीं अवतरणाऱ्या या वेडवाल्या महात्म्याचा गौरव आणि जयजयकार Bee कवींनीं आपल्या 'डंका' (पान ३४) या ओजस्वी काव्यांत केलेला आहे. राष्ट्राच्या अवनतीच्या काळीं त्या ठिकाणीं जिकडे तिकडे दुहीच्या आगी लागतात, समाजात पावित्र्याचें ढोंग फार माजतें, तत्त्वें नाहींशीं होतात व पोकळ औपचारिक विधींचें नसतें अवडंबर माजतें, सामान्य म्हणून समजले जाणारे पुढारी अडाणी मुक्या जनतेला चरकांत पिळून काढतात. क्षुद्र गोष्टींना किंमत येते व जिकडे तिकडे लबाडी बोकाळते. *समाजाच्या जीवनांतून अप्रतिहतपणें वाहणारें आचाराचें* व विचाराचें जल स्वार्थाच्या नवाऱ्यामुळें अडून राहतें व सडतें—

जल सडलें तें निभ्रान्त
तरि धूर्त त्यास तीर्थत्व
देउनी नाडती भोळे !

अशा वेळीं कर्तव्य, श्रेयस् व त्याग याचें खरें स्वरूप काय तें कळत नाहीं. परंपरेची आधळेपणानें पूजा करण्याची प्रवृत्ति वाढते. विचारशक्ति दुबळी होते, बुद्धि आधळी बनते व त्यामुळें तिला आपला राणीपणा सोडून रूढीच्या पदरीं दासीचें काम करावें लागतें. 'आर्यांची परंपरा', 'संस्कृति', 'धर्म' व 'रूढि' याचें राष्ट्रात अतोनात थोतांड माजतें—

ही दंगल जेव्हां होते
नाकळेचि कोठुनि कीं तें,
येतात बंडवाले ते
ज्या हाले, 'स्वागत' बोले!

ह्या बंडवाल्यांना मारून मुटकून निर्माण करावें लागत नाहीं. वर्षाकाळीं अचानकपणें आकाशात अवतीर्ण होणाऱ्या पर्जन्यमेघांप्रमाणें वावटळीच्या वेगानें ते समाजात अकस्मात् उत्पन्न होतात व त्याचें 'स्वागत' करण्यास जग नेहमींच सज्ज असतें. स्वधर्माचा विसर पडल्यामुळें जेव्हां जेव्हा राष्ट्रपुरुषाला ग्लानि येते तेव्हां त्याला जागृत करून नवजीवन देण्यासाठीं प्रत्येक युगात परमेश्वराचा अवतार निर्माण होत असतो, या गीतेंतील कल्पनेला अनुसरूनच ही बंडवाल्यांची कल्पना बसविलेली आहे, हें उघड आहे. पूर्वी महाराष्ट्रात ज्ञानेश्वरमहाराजाच्या नेतृत्वाखालीं संतमंडळींनीं जें सामाजिक, धार्मिक व वाङ्मयात्मक बंड यशस्वी करून दाखविलें त्याचा Bee कर्त्यांनीं मोठ्या अभिमानानें उल्लेख केलेला आहे. त्या थोर स्वार्थत्यागी महात्म्यांनीं शांतीच्या मार्गांनीं समाजाची उत्क्रांति घडवून आणली व प्रेमाच्या पायावर समतेची घटना करून आपलें सर्वस्व 'ब्रह्मार्पण' केलें—

आम्ही त्या दिलजानांचे
साथी—ना मेलेल्यांचे—
हे डंके झडती त्यांचे,
ऐकोत कान असलेले!

जुन्या काळच्या वैभवाचा चढेजाव आळवतारोरनगें सांगत बसणाऱ्या प्रगतिविरोधकांना आपली हास्यास्पद वृत्ति सोडून देऊन—

प्राक्कालाची प्रगतिपरता केवढी मान्य घ्यावी? ( पान ७२ )

असें Bee कवि कळकळीनें सांगतात जीर्णाचा त्याग करून नवीनाचा स्वीकार करणें हाच सृष्टीचा नियम आहे

होते सृष्टि नवी, कलेवर जुने टाका, तुम्ही व्हा तसे
हें ना होय तरी मरा! न तुमची कोणास पर्वा असे!

असे शेवटी कवींनी संतापानें उद्गार काढले आहेत

योग्य वेळ आली म्हणजे सर्व गोष्टी आपोआप घडून येतील. आपण स्वतः निष्कारण तसदी कशाला घ्या, असें म्हणणाऱ्या दुबळ्या वृत्तीच्या निष्क्रिय लोकांना प्रयत्नवादी बनविण्यासाठी कवींनी त्यांना असें सांगितलें आहे—

भागीदार कृतांत मानव असे काला-निसर्गासवें
आणा त्यास समीप एकवटुनी यत्नप्रयत्नोत्सवें! ( पान ३९ )

काळ आणि निसर्ग यांच्या कार्यांत मनुष्यप्राणी हा भागीदार आहे ही कवीची उदात्त कल्पना आपल्या मनांत किती दांडगा आत्मविश्वास उत्पन्न करणारी आहे! विश्वाची प्रगति या तीन घटकांच्या सहकार्यावाचून व ऐक्यावाचून होणार नाहीं हें चिरंतन सत्य आहे. केशवसुतांचा या बाबतींत मतभेद आहे. ते 'तुतारींत' म्हणतात—

निसर्ग निर्घृण, त्याला मुरवत
नाहीं अगदीं पर्वा कशाची
काळासह जी क्रीडा त्याची
ती सकलांना मसान जाची
चुरुनि टाकी प्रचंड पर्वत!

काळ व निसर्ग हे निर्घृण व ध्वंसप्रिय आहेत म्हणून त्यांच्याशीं लढून व झगडून 'ठेवा अपुले उच्च मनोरे!' असा त्यांचा मनुष्यप्राण्यांना आदेश

आहे, तर काळ व निसर्ग यांच्याबरोबर आपण भागीदार आहों व ही भागीदारी प्रेमानें, सहकार्यानें व प्रयत्नानें शेवटपर्यंत टिकवून आपण आपली प्रगति करून घेतली पाहिजे असा Bee कवींचा संदेश आहे. या भिन्न दृष्टिकोनावरून या दोन थोर कवींच्या तत्त्वज्ञानातील महत्त्वाचा फरक लक्षात येण्यासारखा आहे

भारतवर्षातील तत्कालीन दुर्धर, राजकीय व सामाजिक परिस्थितीचें Bee कवींनी केलेलें निरीक्षण व चिकित्सा मार्मिक व अचूक आहेत 'ह्यात काय मशय?' (पान ४१) या कवितेंत प्रस्तुतच्या राजवटींत झालेल्या शैक्षणिक प्रगतीची कवींनीं हृदयभेदक मीमांसा केलेली आहे पोपटाला बोलता येतें हें त्याच्या स्वतःच्या बुद्धीचें सामर्थ्य नव्हे हा मानवमनीचा विजय आहे, पोपटाचा नव्हे आज आम्ही पुष्कळ गोष्टी शिकलों. आम्हाला परभाषत सुरेख पांडित्य करता येतें पण हा सारा आमचा पराक्रम आहे असें का आम्हाला वाटतें? आमच्या संस्कृतीवर आक्रमण करणारे आमचे राज्यकर्ते आपल्या कौशल्याच आणि कर्तृत्वाचें प्रतिबिंब आमच्यात उमटलेलें पाहून विनयाच्या दिमाखानें डौलत असतील! आमच्या ज्ञानाच्या प्रगतीचा हा चमत्कारिक पण खरा अन्वय Bee कवींनीं निर्भिडपणें लावलेला पाहून पुष्कळशा स्वसंतुष्ट आत्म्याना जबरदस्त धक्का बसल्याशिवाय राहणार नाहीं!

'दीपज्योतीस' या रूपकात्मक कवितेंत (पान २२) रूढीच्या निर्जीव पाषाणमूर्तीपुढें स्वतःची सोन्यासारखी तनु जन्मभर जाळीत जसणाऱ्या हिंदु बालविधवेला त्यांनीं अत्यंत कळकळून उपदेश केला आहे -निसर्गानें दिलेल्या मातृत्वाच्या दिव्य शक्तीचा नाश व उपेक्षा स्त्रीजातीनें करतां कामा नये कोणतीहि एखादी शक्ति निसर्ग कोणाला दान देत नाहीं, तर ती कर्ज म्हणून देत असतो. तेव्हा त्या कर्जाची सव्याज फेड करणें हें प्रत्येक ऋणाईत मानवाचें कर्तव्य आहे. Bee कवींची ही कल्पना अत्यंत हृदयंगम व चिरंतन आहे. भारतवर्षाचा भाग्यकाळ अगदीं जवळ आलेला आहे आणि त्याचीं सूचक शुभचिन्हें क्षितीला दिसत आहेत म्हणूनच समाजशुद्धीची 'तीव्र जाणीव' (पान ३९) आपणाला अधिक प्रकर्षानें व्हावयाला पाहिजे. ज्या समाजात जन्मानें अधिकारजाति ठरली जाते तेथें शुद्ध समाज-नीति, समता व सत्प्रेरणा नांदणें शक्य नाहीं अशी कवींची खात्री आहे.

जोपर्यंत स्त्रिया दास्यात आहेत तोपर्यंत त्यांच्या निःसत्व कुशींतून पराक्रमी वीर निर्माण होणें शक्य नाहीं अन्नाशनवाद, अस्पृश्यता असले अन्यायमूलक कृत्रिम भेदभाव ज्या समाजात आहेत त्या समाजाची घटना कालोचित झाली असून ती सर्वथैव निरुपयोगी आहे, असें कवींचें ठाम मत आहे

म्हणून जेथें जेथें विषमता व अन्याय दिसून येतो तेथें तेथें त्यांचा निःपात करून दलित व गलित जीवाना बंधनिर्मुक्त करावयाला पाहिजे, तरच मागील सिद्धांतच्या वडवाल्यानीं आपल्या हातीं निरखून टेवलेल्या भगव्या झेंड्याचें सार्थक होईल! मानवजातीच्या कल्याणासाठीं कराव्या लागणाऱ्या सात्विक युद्धाचें '<u>भगवा झेंडा</u>' हें प्रतीकात्मक निशाण आहे अशा विशाल दृष्टीनें त्या झेंड्याकडे आजपर्यंत एकाहि कवीनें पाहिलेलें नसेल!
(पान ७० )

Bee कवि हे स्वातंत्र्यवादी आहेत पण त्याना केवळ आपल्याच राष्ट्रापुरतें किंवा समाजापुरतें आकुंचित स्वरूपाचें स्वातंत्र्य नको आहे

> तें स्वातंत्र्य खरें न, फक्त अपुलीं जें तोडितें बधनें,
> अन्याच्या पदशृंखलास बघतें निष्कंप ऐशा मनें.
> या, त्या आपण वागवू निजपदीं त्याच्यासवें प्रत्यहीं,
> तोडू त्यास समग्र एक करुनी आकाश पाताळहि!

जोंपर्यंत या पृथ्वीच्या पाठीवर एकदेखील राष्ट्र परतंत्र व गुलाम राहिलेलें आहे तोंपर्यंत इतर राष्ट्रें उपभोगीत असलेल्या स्वातंत्र्याची काय किंमत आहे? स्वातंत्र्याचा इतक्या व्यापक दृष्टीनें विचार करणाऱ्या Bee कवींच्या अंतःकरणात अखिल मानवजातीची कल्याणबुद्धि किती ओथंबलेली आहे हें दिसून येतें आजच्या युगातल्या भाषाप्रयोगानें म्हणावयाचें झाल्यास Bee कवींची ही हितबुद्धि 'आंतरराष्ट्रीय' स्वरूपाची आहे व माझ्या मतें ती आधुनिक मराठी कवितेंत तरी अपूर्व आहे अशा तऱ्हेनें तत्त्वज्ञानाची व जीवनाची Bee कवींनीं आपल्या काव्यात सुंदर सांगड घातलेली आहे त्याची विवेचनपद्धति प्राणिशास्त्राच्या व समाजशास्त्राच्या नियमावर आधारलेली असल्यान त्यांचें काव्य ही कल्पनेच्या सृष्टींतील वारेमाप बडबड आहे,

असें न वाटून तें आयुष्यातील महत्त्वाच्या प्रश्नाचें सूक्ष्म व शास्त्रशुद्ध विवेचन आहे अशी खात्री होते. काव्याचा व शास्त्राचा मनोहर मेळ घालण्याचा Bee कवींनीं प्रयत्न केला आहे हेंच त्यांच्या कवितेचें एक महत्त्वाचें वैशिष्ट्य आहे.

Bee कवींच्या कवितेमधील दुसरा बराच मोठा विभाग काव्यविषयक चर्चेला वाहिला गेलेला आहे. काव्य म्हणजे काय, त्याचें ध्येय काय, काव्यानंद कसा असतो, प्रतिभेचें खरें स्वरूप कसें आहे, कवींचें कार्य कोणतें, आधुनिक कवितेवरचे आक्षेप काय आहेत, इत्यादि सर्व महत्त्वाच्या व वादविषयक प्रश्नांची त्यांनीं निरनिराळ्या कवितांमधून मार्मिक व स्पष्ट चर्चा केलेली आहे. काव्यातील वादभूत स्थळांची काव्यामध्येंच चर्चा करणारे ते पहिलेच कवि ठरतील. '<u>कविवदन</u>' (पान २) या कवितेंत त्यांनीं काव्याची व्याख्या केलेली आहे ही व्याख्या पाश्चात्य साहित्यकाराच्या आधुनिक काव्यविषयक कल्पनेच्या कसोटीला उतरेल अशी खात्री आहे 'काव्य म्हणजे सौंदर्याचा निःश्वास' असें एक इंग्रज कवि म्हणतो, तर दुसऱ्या एका टीकाकाराच्या मतें 'काव्य म्हणजे सौंदर्यातील सत्याविष्करण' हें होय! Bee कवि या व्याख्याच्या पलीकडे जाऊन म्हणतात कीं, 'सौंदर्यचि काव्य!' (पान ५) मात्र सौंदर्याच्या स्थावर व निष्क्रिय स्वरूपाला उद्देशून ते बोलत नाहींत 'ऐश्वर्यात्मक सामर्थ्य निर्माण करण्याची शक्ति ज्या सौंदर्यांत आहे तेंच खरें काव्य' असें त्यांचें मत आहे अंतरंग ओथंबून ओसंडणारी ही सुंदरता कवींच्या स्वानंदाचें जिव्हार आहे आणि या सौंदर्याची दिव्य प्रस्फुरणशक्ति म्हणजेच कवीची स्फूर्ति किंवा प्रतिभा! या स्वर्गीय शक्तीच्याच इंद्रजालामुळें काव्यांतील सौंदर्याचा विकास 'न्हसानाशाविण' सदोदित चाललेला असतो विद्युल्लतेच्या वेगानें व तेजानें कवीच्या अंतःकरणात स्फूर्तीचे दिव्य संदेश कसे लकाकतात व ते ऊर्जस्वल आलेल जड व पार्थिव वाणींत व्यक्त करणें कसें दुष्कर आहे याचें अत्यंत मनोहर रेखाचित्र कवीनें एका ठिकाणीं रेखाटलेलें आहे —

अंतःकरणपटावरतीं । आत्यंतिक वेगें उठती
दिव्य लेख उन्मेषाचे । धरावया ते स्मृति काचे

बुद्धीच्या भिंगावरती । बिंबित ज्या प्रतिमा होती
शब्दचित्र त्याचें कसलें । न कळे काढिल मन दुबळें

काव्य हा सुंदर व नादमधुर शब्दांचा निव्वळ मेळ नव्हे—काव्य म्हणजे अर्थचमत्कृतीच्या डोंबारी मारतो तशा कोलटउड्या नव्हत—काव्य म्हणजे मारवाड्याच्या लग्नातील थाटामाटाची व झगझगाटाची आरास नव्हे किंवा काव्य ही शुष्क नीतिपाठानें काठोकाठ भरलेली लाखलचक व कपाळवाणी गोणीहि नव्हे ! कल्पना हाच काव्याचा प्राण आहे. जगातील ज्ञानातून कल्पनेचा भाग वजा केला तर बाकी काय राहणार आहे ? भौतिक शास्त्राचा देखील हाच आत्मा आहे व त्या दृष्टीनें पाहता काव्य व भौतिक शास्त्रें यांच्यामध्यें यत्किंचित् विरोध नसून अभेदच आहे व्याकरणाच्या दगडी खलबत्त्यानें ऱ्हस्व—दीर्घ—वेलांटी—मात्रांचें कुटून कुटून तयार केलेलें वस्त्रगाळ चूर्ण म्हणजे काव्य असें काहीं कर्कश तर्कनिपुणांचें व प्राशवर प्रशा घनाचें प्रामाणिक मत आहे अशा काव्याभासाच्या भ्रामक आनंदावर स्वतःची गुजराण करणाऱ्या या वेदाभ्यासजडांना उद्देशून Ree कवि मिष्किल विनोदानें म्हणतात—

मृगजळ पाणी भरुनि राजणीं पढिका फुजू दे
सौंदर्याचे कुर्जी आम्हा र्जा घाळू दे (पान ४)

कवींच्या प्रतिभेच्या विराटशक्तीचें काव्योदात्त वर्णन '<u>वेडगाणें</u>' (पान ८) या नितांतमधुर गीतात कवीनें केलें आहे सामान्य लोक म्हणतात कीं, प्रतिमा ही नुसती टला ट आणि रीला री जळवून कविता बनविणारी एक शक्ति आहे, पण तिच्या अद्भुत सामर्थ्याची त्याना कल्पना नाहीं त्या आकाशाच्या भव्य प्रासादाला सूर्यचंद्राच्या प्रकाशाचीं देदीप्यमान दारें लावलेलीं आहेत व त्या दाराना नक्षत्रमालेच्या लाखलचक व तेजस्वी झालरी लावलेल्या आहेत तिथें ही शक्ति राहते लावण्याच्या रौप्यरसलहरीं नल सिंचनानें वाढविलेल्या पाचूच्या हिरव्यागार लतावेली तिच्या उद्यानात विलसत आहत, तर तिच्या गगनमरली उंबरठ्यावर स्वर्गीच्या देवदेवता सदोदित उभ्या राहिलेल्या आहेत नभरत्नांच्या गगनव्यापी विमानात बसून अनंताला प्रदक्षिणा घालून येणें हा या विश्वाच्या राणीचा अखंड आनंदता

व्यवसाय आहे. अशा तऱ्हेनें ब्रह्मांडाच्या प्रचंड घडामोडी अहर्निश करीत बसलेली ही विराटशक्ति कोणाच्याच कह्यात जाणें शक्य नाहीं हें तर उघडच आहे; पण तिची आपल्या स्वतःवर देखील सत्ता नाहीं! याच शक्तीच्या अनुग्रहामुळें कवीच्या अंतःकरणात दिव्य आनंदाच्या खाणी खुल्या होतात. अर्थात् त्या आनंदाचें वर्णन फक्त मनोमय वाणीच करूं शकेल! राठ शब्दांची पांगळी रसनती तो आनंद कसा व्यक्त करूं शकेल? या गीतातील शब्दाशब्दात व्यक्त झालेलें Bee कवींच्या प्रतिभेचें सामर्थ्य व तेज रसिकाच्या बुद्धीला थक्क करुन टाकल्याशिवाय राहणार नाहीं.

उदात्ततेला प्रसविताना कवीच्या अंतःकरणात जें दिव्य प्रस्फुरण होतें त्या वेळीं त्याला जो लोकोत्तर आनंद होतो त्याचें अप्रतिम वर्णन 'काव्यानंद' या कवितेंत ( पान ७३ ) कवीनें केलेलें आहे—

येथे अद्‌भुतरम्य नित्य पडलें स्फूर्तिप्रभेचें कडें,
अम्लान प्रतिभा-कळ्या उमलल्या आहेत चोहींकडे.
वोसंडे दुथडी भरूनि सरिता सत्कल्पना पावन
वृत्तींची रसलीन चंचळ खगश्रेणी करी क्रीडन.

हें वर्णन वाचल्यानंतर हिमाच्छादित गिरिशिखरांनीं वेष्टिलेल्या, दुग्धधवल गंगाप्रवाहाला जन्म देणाऱ्या गंगोत्रीच्या एखाद्या वसंतऋतूतील सूर्योदयाच्या वेळीं दिसत असलेल्या मनोहर देखाव्याची आठवण होते.

लोकोत्तर काव्यांना जन्म देणारी स्फूर्ति ही नैसर्गिक शक्ति असून ती देवी शारदेच्या प्रसादानेंच प्राप्त होणारी अशी सिद्धि आहे. समुद्रमंथन करणाऱ्या दैत्यांच्या जबरदस्तीनें मारून हाणून काव्यरचना करणाऱ्या हठकवींना, वायुसुतप्रमाणें वेड्यावाकड्या उड्या मारण्यात गर्व मानणाऱ्या चेष्टाकवींना किंवा शास्त्रवेत्त्या पंडितांना आणि शब्दवैपुल्याच्या जोरावर जगणाऱ्या वाचाट टीकाकारांना खऱ्या काव्यानंदाचा अनुभव येणें कदापि शक्य नाहीं ( पान ७३ ).

भवींच्या कार्याची व सामर्थ्याची Bee कवींनीं केलेली मीमांसा जितकी अभिनव तितकीच मार्मिक आहे. पूर्णत्वाच्या ध्येयाकडे चाललेल्या सृष्टि-

चक्राला प्रवासाच्या प्रचंड परिश्रमामुळें दुर्बळता येऊ नये म्हणून मृदुमधुरोज्ज्वल गीतांच्या अमृतानें विश्वाचें तेजोवर्धन वादविणें हें कवींचें कर्तव्य आहे. कधीं गोड आणि कधीं कठोरहि पण बोलून सृष्टिचक्र योग्य मार्गावरून जाईल अशी कवींनीं सावधगिरी ठेविली पाहिजे. भूतकाळाच्या निर्जीव हाडांच्या सांगाड्यात एका फुंकीसरशीं कवि चैतन्य उत्पन्न करूं शकतो, तर 'प्राक्कालाची प्रगतिपरता' ध्यानांत धरून—

देऊं तोंड नवीन काळ जर हा होऊन आम्ही नवे !

अशा उद्बोधक संदेशानें तो वर्तमानकाळहि घडवीत असतो. तथापि, सोज्ज्वल भविष्यकाळ आपल्या चिच्छक्तीनें निर्माण करणाऱ्या कवीचें सामर्थ्य अत्यंत अद्भुत आहे. इमारत बांधण्याच्या आधीं ज्याप्रमाणें एखादा एंजिनिअर बांधकामाचा नकाशा तयार करतो, त्याप्रमाणें भविष्यकाळाच्या उदरात असलेल्या अनेक उदात्त घटनांचीं रेखाचित्रें हजारों वर्षें आधीं कवीनें आपल्या कल्पनेनें रंगरून ठेविलेलीं असतात. भविष्यकाळाची कवीला नुसतीच अस्पष्ट स्वप्नें पडत नसून त्याला त्या काळाचा प्रत्यक्ष साक्षात्कार होत असतो. म्हणूनच Bee कवि सांगतात—

काव्य अगोदर झालें, नंतर झालें जग सुंदर
रामायण आधीं, मग झाला राम जानकीवर[1] ( पान ८७ )

श्रीरामाचा प्रताप, कृष्णाचें ऐश्वर्य, रुद्राची कठोरता, बुद्धाची दया महमदाचा पैगाम किंवा खिस्ताचें कारुण्य या लोकोत्तर गुणांच्या निर्मितीचें श्रेय कवींनाच द्यावयाला पाहिजे ( पान ५० ). उद्याचा तेजस्वी भारतवर्ष घडविण्याचें काम आज कवीच करीत आहेत विश्वाच्या आरंभापासून आजपर्यंत कवींची ही उज्ज्वल परंपरा अबाधितपणें चालू आहे. Bee कवि हे अत्यंत आशावादी आहेत, पण त्यांच्या आशावादाची उभारणी केवळ तरल कल्पनेवर किंवा अनुमानावर झालेली नाहीं. भारतराष्ट्राच्या नभोमुकुरावर त्यांना क्रांतिकारक महाकवीच्या आगमनाचीं मंगल चिन्हें दिसूं लागलीं आहेत आणि म्हणून या महाकवीचा मार्ग जितका सुकर व सुखकर करता येईल तितका तो करण्याचा प्रयत्न आजच्या 'राजनिष्ठ' कवींनीं करावयाला पाहिजे. Bee कवींनीं दिलेल्या या आदेशात किती व्यापक अर्थ भरलेला

आहे तो थोडक्या शब्दात व्यक्त करणें कठीण आहे. मात्र, ऐश्वर्यात्मक सौंदर्य उत्पन्न करणारा कलावंत तो कवि अशी कवीची व्यापक व्याख्या या *ठिकाणीं अभिप्रेत आहे हें ध्यानात ठेवावें,* नाहींतर Bee कवींनीं दिलेली सूचना ही पडत्या फळाची आज्ञा समजून हजारों पद्य मजूर या महाकवी-साठीं तयार होणाऱ्या राजमार्गावर आपल्या शब्दाचा मुरूम व कल्पनेची खडी पसरण्यासाठीं धावत यावयाचे !—आणि असें झालें तर 'काम चालू. रस्ता बंद' ही पाटी ज्या बाजूनें हा महाकवि येणार असेल त्या बाजूलाच लागली जावयाची ! रा. आनंदराव टेकाड्यांनीं आधीं कवींना सांगूनच ठेविलेलें आहे कीं—

*वास्तव कविंनो, काव्य करा !*

तेव्हांपासून नेरेचसे कवि कंबरा बांधून काव्यें पाडावयाला नसल्याचें ऐकिवात आहे म्हणून ही भीति या ठिकाणीं व्यक्त करणें जरूर आहे

आधुनिक मराठी *कवितेचे Bee हे जाज्वल्य अभिमानी आहेत ही* गोष्ट येथें सांगणें आवश्यक आहे दोन तपांपूर्वी आधुनिक विचाराची व कल्पनांची जी प्रचंड लाट महाराष्ट्रावर आली होती, तीमुळें नवीन पिढीच्या अंगात विलक्षण चैतन्य उत्पन्न झालं, तर जुन्या पिढींतील पुराणाभिमान्याच्या नाकातोंडावर त्या लाटेचा आघात नसल्यामुळें त्यांचे डोळे पांढरे होण्याची वेळ आली. राजकारण, समाजव्यवहार, साहित्य इत्यादि निरनिराळ्या क्षेत्रात अर्वाचीन व प्राचीन असे दोन तट पडले व या दोन पक्षातील सैनिकांचीं पदोपदीं द्वंद्वयुद्धें जुंपू लागलीं काव्यप्रांतातील युद्धाला निर्यमक कवितेचें निमित्त झालें. रेंदाळकर व नागेश या दोन आधुनिक कवींनीं निर्यमक कवितेचा जोरानें पुरस्कार करण्यास त्या वेळीं सुरुवात केली होती कविता-सुंदरी ही एखाद्या कुलस्त्रीप्रमाणें अलंकार भूषणाभरणानीं एखाद्या सराफाच्या चालत्या बोलत्या दुकानाप्रमाणें दिसावयाला पाहिजे ही त्या वेळीं प्राची नाची दृष्टि होती ! टोंक्यावर पेडाची पिळदार वेणी, तिच्यात करकचून घातलेली मूद व अग्रफुलें, कानात बाळ्याबुगड्या आणि भोकरें, गळ्यात गळसरी आणि काळ्या पोतीच्या माळा, हातांत कोपरापर्यंत भरलेल्या गोट-पाटल्या आणि पांगड्या, पायांत चांदीच्या वजनदार तोरड्या आणि तोडे,

याशिवाय नेसलेली नोंगेनाज जरतारी पैठणी एवढा जडजोखमीचा बोजा अंगावर घेतल्यामुळेंच कीं काय, गजगामिनी झालेली महाराष्ट्र महिला सैलसा बुचडा घालून, साधें तलम पातळ नेसून व पायांत चपला घालून जेव्हा एखाद्या हरिणीप्रमाणें तल्ख गतीनें व मोकळ्या चालीनें फिरू लागली तेव्हा जुन्यापुराण्या जीवांना जेवढा जबरदस्त धक्का बसला आणि ते आपल्या चष्म्याचीं जाड भिंगें उपरण्यांच्या टोकांनीं पुसून पुसून जसे तिच्याकडे क्रोधारक्त नजरांनीं बघूं लागले तशीच परिस्थिति निर्यमक कवितेच्या बाबतीं तहि निर्माण झाली 'बिघडली रे बिघडली' असा आधुनिक तरुणीला पाहून सनातनी आत्म्यानीं हंबरडा फोडला, तसाच टाहो आधुनिक कवितेचें नवीन स्वरूप पाहून गतानुगतिक टीकाकारांनीं फोडला! कांहीं काळ तरी खूपच दंगल माजून राहिली या धुमश्चक्रींत आधुनिक कवींच्या पलटणींत Bee कवि आपण होऊन दाखल झाले वस्तुत Bee कवींचा व्यवहारातील लाजरा व एकान्तिक स्वभाव लक्षात घेता कोणत्याहि धकाबुक्कीच्या दंगलींत हल्ला करणारा या नात्यानें त्यांनीं दाखल व्हावें ही गोष्ट आश्चर्योत्पादकच होती स्वत च्या काव्यावर होणाऱ्या टीकेमुळें तर त्यांच्या मनाची स्थिति तात्काळ चलबिचल होत असे 'विचारतरंग' (पान ५४) या कवितेंत ते म्हणतात—

> सोप्या सोप्या शब्दांनीं, स्फूर्ति सुजान गुफोनीं,
> मंजुळ मंजुळशीं गाणीं, रचुनी रसिकान्त करणीं
> हळू शिरावें चोरोनी, जावें मीपण लोपोनी
> हौस मनीं ही असे परी, टीका तीतें विफल करी!

टीकेच्या बाबतींत इतकें त्यांचें मन हळवें असे बाळकवि ठोमरे व मायगा या कवींबद्दल वाटणाऱ्या आत्यंतिक आपुलकीच्या भावनेमुळेंच Bee कवि या वादाच्या दंगलींत पडले हें जरी एका अर्थी खरें असलें तरी मुख्यत्वेंकरून आधुनिक मराठी कवितेसंबंधीं अंत करणापासून त्यांना वाटणाऱ्या जिव्हाळ्यामुळेंच ते तिच्या विरोधकांशीं सामना देण्यास उद्युक्त झाले असले पाहिजेत

या आधुनिक काव्याच्या विरोधकांचे असे आक्षेप होते कीं, आधुनिक कविता अर्थंत उथळ, अल्लड व पोरकट आहे तिला नवीन नवीर लागल्या

चालीरीति व खोडी फार खराब आहेत. तिच्यात शब्दचमत्कृति किंवा सत्य अथवा गांभीर्यहि नसतें. निव्वळ वाऱ्यावरचे काल्पनिक इमले बांधण्याकडे तिचें लक्ष असतें. विषय व भाषा या दोन्ही बाबतींत तिची क्षुद्रता दिसून येते. उत्क्रांतिवाद, शास्त्रीय सिद्धान्त, ज्योतिर्विषयक घडामोडी असल्या गहन विषयाचें तिला वावडें आहे. अलंकार–व्याकरण–भाषाशास्त्राच्या नियमाचें पदोपदीं उल्लंघन तिच्या हातून होत असतें. या सर्व आक्षेपांना Bee कवींनीं किती समर्पक व बिनतोड उत्तर दिलेलें आहे तें आतापर्यंत त्यांच्या कवितांच्या केलेल्या विवेचनाच्या ओघांत आलेंच आहे. मराठी भाषेला स्वतंत्र अस्तित्व असून संस्कृतभाषानियमांची बळजोरी तिनें आपल्यावर करून घेण्याचें मुळींच कारण नाहीं असें त्यांचें ठाम मत आहे. आधुनिक कवितेंत टीकाकारांना ज्या गोष्टी पोरकटपणाच्या व उथळपणाच्या वाटतात ती तिच्या मुग्ध तारुण्यदशेंतील मोहक चंचलता आहे असें Bee कवींचें मत आहे—

कोमल कलिकेमधली अस्फुट मधुसौरभसृष्टि
बादल छायेआडिल किंवा चंद्राची दृष्टि
प्रौढ कलाल्यत्राचें वारें अंगिं न जरि वाजे
मुग्धदशेची चंचलता तुज कुलजेतें साजे. (पान ३)

असें आधुनिक कवितेला उद्देशून Bee म्हणतात. कवितेच्या साम्राज्यात नवीन संप्रदायाची 'बंडाळी' झाल्यानें कांहीं घोर पातक होत नाहीं. महाराष्ट्रकविपरंपरा ही अखंड आहे व ती सदीच अबाधितपणें चालू राहणार. टीकाकाराच्या मतानुसार काव्यरचना करावयाची झाल्यास महाराष्ट्रकाव्योद्यानाचें अल्पकाळात वैराण वाळवंटात रूपांतर होईल असें Bee कवींनीं स्पष्टपणें सांगितलें आहे. कवितारस झडकरी मनात यावा–पुण्याचा ठेवा। दाता परि नीरस काय करावा?—जन मार्मिक व्हावा!' या रामजोशाच्या पदीचा 'चांदणी' (पान ६०) या कवितेच्या अग्रभागीं Bee कवींनीं उपयोग केलेला आहे, तो अत्यंत समर्पक आहे. तुटपुंज्या ज्ञानाच्या भांडवलावर स्वतःस अहंमन्य पंडित व रसिक म्हणवून घेणारे 'सरस्वतीकंठाभरण' यांना आधुनिक कवितेचें सौंदर्य कळणें शक्य नाहीं. कारण—

पंडितपण तें रसिकपण । बहुधा असतीं हीं भिन्न
दोहोंचा अन्वय एकीं । सांप्रत दुर्मिळ ह्या लोकीं ।

असा एकदर त्या वेळच्या परिस्थितीचा Bee कवींनीं निष्कर्ष काढला व म्हणून त्याचें अंतःकरण कळवळलें. त्या विषण्णतेच्या मनःस्थितींत त्याच्या तोंडून उद्गार निघाले—

महाराष्ट्रकविपरंपरा । खंड न पडला तिला जरा;
उणीव रसिकांचीच परी । आज भासते खरोखरी

Bee कवींनीं हें रसिकाबद्दलचें *विशिष्ट अर्थानें केलेलें विधान* सर्वसाधारण कवितेच्या वाचकांना उद्देशून केलेलें आहे असा गैरसमज त्या वेळीं पुष्कळांच्या मनात उत्पन्न झाला व त्यामुळें Bee कवींवर बरीचशी टीकेची पैर झडली. या हल्ल्याचा पुढाकार त्या वेळीं विशेष प्रसिद्धीस आलेले नागपूरचे कवि श्री. आनंदराव टेकाडे यांनीं घेतला. त्यांनीं 'आधुनिक कवींची कुरकूर' या नावाची एक टीकात्मक कविता लिहून (आनंदगीत पान ११३) Bee कवींनीं रसिकाबद्दल केलेलें उपर्युक्त विधान अहंकारार्चे व आक्षेपार्ह आहे. आपल्याला स्वत ला कविता करता येत नाहीं. रसिकाना दोष देण्याचें *कारण नाहीं, अशी टीका* केली. *Bee कवींचें* काव्य, आधुनिक मराठी कवितेची त्यांनीं केलेली श्रेष्ठ सेवा हीं सामग्र्यानें लक्षात न घेता किंवा कोणत्या तऱ्हेच्या रसिकाबद्दल त्यांनीं हें टीकात्मक विधान केलेलें आहे हें मागील व पुढील संदर्भाच्या अनुरोधानें नीट समजून न घेता आनंदरावांनीं Bee कवींवर टीका करण्याची फार घाई केली असेंच कोणाचेंहि मत होईल. विशेषत —

उणीव सांप्रत रसिकांची । असें खरोखर म्हणण्याची
लज्जा वाटावी कविंना । व्यर्थ घडे निज विटंबना.

*अशी तीव्र भाषा Bee कवींना उद्देशून वापरण्यात त्याच्या हातून* अन्याय व अनुदारपणा झालेला आहे असें वाटतें. *आनंदरावांसारखा* दिलदार कवि अशी टीका लिहिण्यास कसा प्रवृत्त झाला याचें कुणालाहि आश्चर्य वाटेल! तथापि, 'आनंदगीता' चे प्रस्तावनालेखक लो. ना.

माधवरावजी अणे यांनीं Bee कवींवर याच वादाच्या अनुसंधानानें कठोर शब्दांची जी आग पाखडलेली आहे ती सर्वस्वीं अनवश्यक व अन्यायमूलक असून टीकेच्या भरात अभिनिविष्ट टीकाकार मूळ मुद्दे सोडून अनवश्यक गोष्टींचा धुरोळा कसा उडवतात याचीच द्योतक आहे. Bee कवींनीं 'अनुकार' या कवितेंत टेकाड्याच्या आक्षेपाना मार्मिक उत्तर दिलें आहे ते म्हणतात: कवितेच्या प्रांतात होत असलेला अन्याय दूर करण्याचा मीच स्वतः प्रयत्न करीत आहें, आणि माझ्यावरच उलट हल्ला व्हावा हा अजबच न्याय आहे! —

अंधार नगरचा उलटा न्याय!
अदंड्य दंडा भाजन होय;
पय घटिका पी, घड्याळ हाय!
खाई टोला! (पान ५८)

मनाचा व भाषेचा समतोलपणा यत्किंचितहि ढळू न देता प्रतिपक्षावर टीका करण्याची Bee कवींची धीरोदात्त वृत्ति बघून कौतुक वाटतें. आजच्या काळांतील काहीं अशिक्षित, असंस्कृत व स्वार्थसाधु संपादकानीं पोसलेले साहित्य गारदी एकमेकावर हल्ले चढवितांना जी भाषा व जे शब्द वापरतात ते लक्षात घेतले म्हणजे Bee सारखा सभ्य व सरळ मनाचा टीकाकार रामराज्यातच असावयाला पाहिजे होता असें वाटतें. अप्रिय बोलताना तें दुसऱ्याना बोचूं नये व स्वतःवर ग्राम्यपणाचा आरोप येऊं नये अशा सावधगिरीनें Bee हे आपल्या टीकास्त्राची योजना करतात. आधुनिक मराठी कवितेच्या विरोधकाना 'विदग्ध धी, कर्कश-शुष्क-तर्क-निपुण, विशाल भणि-मोटे, प्रज्ञाघन किंवा मतिमंद' अशा विशेषणानीं त्यांनीं संबोधिलेलें आहे. धाबळी नेसलेला एखादा सनातनी साहित्यिक देखील या 'शिव्या' बद्दल कधीं तक्रार करणार नाहीं!

Bee कवींनीं स्त्रीप्रेमविषयक अशा सदा सात कविता लिहिल्या आहेत. त्यांमध्यें 'बकुल' व 'बुल्बुल' या कविता चांगल्या असून 'चांफा' हें गीत सर्वोत्कृष्ट आहे. 'बकुल' (पान ७७) या कवितेंत एका प्रणयिनीचा विरहभाव व्यक्त केलेला आहे. प्रेमविषयभूत झालेल्या प्रेमीजनाची

स्त्रीस्वभावसुलभ चांचल्यामुळें एका तरुणीकडून प्रथम हेळसांड होते आणि तदनंतर तिला पश्चात्ताप होतो अशी या कवितेची हृदयस्पर्शी भूमिका आहे सौंदर्याच्या उन्मादानें मस्तक धुंद झाल्यामुळें तरुणी आपल्या प्रियकराची जी निष्ठुर अवहेलना करतात त्याच्या डोळ्यांत या कवितेनें झणझणीत अंजन घालेल 'बुल्बुल' (पान ७८) या कवितेंत प्रेमभंगाची एक अद्भुत व करुणमनोहर कथा वर्णन केलेली आहे पूर्वजन्मातील एक प्रियकर व त्याची प्रणयिनी हीं प्रेमाची पूर्तता न होतां मरण पावलेलीं आहेत पुढील जन्मीं तो तरुण बुल्बुल होऊन जन्माला येतो व ती तरुणी एका स्मशानांत जातिलतेचा जन्म घेते तथापि पूर्वजन्मातील प्रेमाची स्मृति त्याच्या मनामध्ये तशीच जागृत राहिल्याकारणानें फिरून त्या जन्मींदेखील त्या प्रेमी जीवांची जोडी जमते रोज रात्रीं तो प्रेमविह्वळ बुल्बुल त्या जाईच्या लतेवरील येई व व्याकुल कंठानें शोकगीतें आळवीत असे बुल्बुलाच्या सान्निध्यांत मागील प्रेमस्मृतीच्या अखंड अमृतसिंचनानें ती जाईची कृश वेल स्मशानांत असूनहि नित्य टवटवीत आणि फुलांपानांनीं बहरलेली दिसे तें दृश्य पाहून तिथें येणाऱ्या स्त्रियांना अत्यंत आश्चर्य वाटे त्या म्हणत

वसंत न करी चैत्रशिंपणें,
होलत रविकर न करी येणें,
पुरे न अंतरि तरिही तेणें,
अगाध्य नवल । ही जाइ न या महिवरिल

त्या मसणवटीला लागून असलेल्या गांवातील लोक बुल्बुलाच्या मधुर स्वरांनीं स्मशानाकडे खेचले जात व तेथें पसरलेल्या नादब्रह्मांत ते इतके विलीन होत आणि त्या प्रेमविलापाशीं त्यांचें इतकें तादात्म्य होई कीं, क्षणभर ती जातिलता व तो बुल्बुल यांना ते विसरत आणि त्यांच्या दृष्टीपुढें असा आभास उत्पन्न होई कीं आपल्याच विफल झालेल्या प्रीतीचे बोल आपल्याच अंतःकरणांतून बाहेर पडत आहेत बुल्बुलाचें हृदय फोडून उत्कटतेनें उमटणाऱ्या त्या शोकगीताच्या स्वरांत कोणा तरी स्त्रीच्या नांवाचा स्पष्ट उच्चार होत असावा असें त्या लोकांना वाटे प्रेम ही एक दिव्य शक्ति

आहे तिचें आकर्षण पार्थिव देहाच्या विनाशानें नष्ट न होता तें अपरति इतरग जन्मजन्मातरीं देखील कायम राहतें हें तत्त्व कवीनें अत्यत हृदयंगम कल्पनमध्यें व्यक्त केलेलें या कवितेत आढळून येईल विशेषत, कवीनें या कवितेतील अद्भुततेचा जो अंश मिसळलेला आहे त्यामुळें तिच्यातील भावना अधिकच हृदस्पर्शी झालेली आहे

'चापा' हें गीत शुद्ध प्रेमाचें नितातसुदर सूक्तच आहे असें म्हणाव्यास हरकत नाहीं B०० कवींच्या स्त्रीप्रेमविषयक कल्पनाचें उदात्त, विशुद्ध आणि ओजस्वी स्वरूप या गीतात प्रकट झालेलें आहे या कवितेची रचना प्रती कात्मक असल्यानें पुष्कळाना तिचा अर्थ कळत नाहीं व त्यामुळें ती गूढ आहे असें वाटतें "निसर्गसिद्ध शुद्ध प्रेमभावनेचे निराळले नि शक आतुर उद्गार 'चापा' या कवितेत आहेत प्रेमीभूत ध्येयविषयाची गाठ पडली असता, आणि प्राप्ति झाली असता सर्वच देहस्वभाव पालटून निखळ प्रेम हाच एक सहजस्वभाव बनून जातो" असें या कवितेचें खुद्द कवीनें एके ठिकाणीं स्पष्टीकरण केलेलें आहे तें कवीच्या नेहमींच्या भाषापद्धतीप्रमाणें सूत्रमय असल्यानें सामान्य वाचकाना पारसें कळण्याचा संभव नाहीं प्रेम मीलनास अत्यत आतुर झालेली एक निष्कपट व निर्व्याज भावनेची मैत्रीण गभीर वृत्ति धारण करून मुसलमानाप्रमाणें बसलेल्या आपल्या जिवलग मित्राला 'चांपा' कल्पून हें गाणें म्हणत आहे, ही भूमिका लक्षात घेतली म्हणजे या कवितेतील सर्व कल्पना आपोआप उलगडत जातील या रुसक्या 'चापया' ला फुलविण्यासाठीं, खुलविण्यासाठीं आणि झुलविण्यासाठीं त्याच्या या आवडत्या सखीनें काय काय खटपटी आणि कल्पना केल्या असतील हें रसिक वाचकानीं कल्पनेनें जाणलेलें बरें इतकेंहि करून तो जेव्हा एखाद्या शुक्राचार्याप्रमाणें मख्ख मुद्रा करून बसला, मुळीं बोलेना, चालेना किंवा फुलेना तेव्हा ती त्याला ओढीत ओढीत आब्याच्या वनात घेऊन गेली. तिथें तिनें मैनांच्या गळ्यात गळा मिळवून पुष्कळ गाणीं म्हटलीं पुढें ती त्याला केवड्याच्या वनात घेऊन गेली तिथें दरवळणाऱ्या सुगधामुळें तीहि तेथील नागाप्रमाणें देहभान विसरून डोलू लागली नंतर ती पशु-पक्ष्याच्या मधुर कोलाहलानें गजबजलेल्या रानातून फिरून आली तिथें धिप्पाड कड्याला आपल्या रुपेरी बाहूचा विळखा घालून *विहार करीत*

असलेली सरिता त्याना दिसली. प्रेमवेडा मेघ विद्युल्लतेला आपल्या करपाशांत घेण्याचा प्रयत्न करीत आहे, आणि ती त्याला चळकन् झुकांडी देऊन निसटून जात आहे हें दृश्य त्यांनीं पाहिलें. एका मुग्धमधुर कळीच्या सौंदर्यामुळें मोहित झालेला वारा तिच्याशीं उगाच वात्रटपणा करीत बसला होता, इतका कीं, आपल्याला इतर लोक काय म्हणतील याचेंहि त्याला भान नव्हतें, हाहि देखावा त्याच्या दृष्टीस पडला. निसर्गांत निःशंकपणें चाललेल्या शुद्ध प्रेमाच्या या लीला बघून त्या मैत्रिणीची आर्तता अधिकच वाढली. ती आपल्या सवंगड्याच्या हातात हात घालून त्याच्याशीं प्रेमाचा झिम्मा खेळू लागली. 'अरे, हें विश्वाचें एवढें मोठें अंगण आपल्याला आंदण दिलेलें आहे,' ती म्हणाली, पण आपल्या प्रेमाच्या थारंगाला देखील तें पुरावयाचें नाहीं ! इतर लोकांप्रमाणें आपलें प्रेम कामुक थोडेंच आहे !—

'जन विषयाचे किडे
याची धाव भाह्याकडे
आपण करू शुद्ध रसपान !'

असें म्हटल्याबरोबर, 'चाफा' विरघळला ! दृष्टीला दृष्टि मिळाली आणि त्याच्या अंगावर थरथरून रोमांच उभे राहिले. आणि मग दोघेहि देहभान विसरून एकमेकास कडकडून भेटलीं. या अपूर्व मीलनाचें वर्णन Bee कवींनीं अत्यंत कौशल्यानें केलेलें आहे—

चाफा फुलीं आला फुलून
तेजीं दिशा गेल्या आटून
कोण मी ? —चाफा ? कोठें दोघेजण ?

Bee कवींच्या उदात्त तत्त्वज्ञानाचा व तेजस्वी कलेचा या काव्यांत अत्यंत हृदयंगम संगम झालेला आहे. त्यामुळें Bee कवींच्या काव्यसंग्रहातच नव्हे तर सर्व आधुनिक मराठी काव्यामध्यें या गीताला अढळ कीर्ति मिळेल यात शंका नाहीं. Bee कवींच्या प्रेमकाव्यात वैयक्तिक व वैषयिक असें काहींच नसल्यामुळें सामान्य वाचकाच्या अतृप्त कामुकतेच किंवा पाजील जिज्ञासेचें समाधान होण्याची त्यामध्यें मुळाच सोय नाहीं, याबद्दल ते दोषास प्राप्त झाल्यास नाइलाज आहे, एवढेंच म्हणावें लागेल !

'माझी कन्या' (पान १७) व 'वात्सल्य' (पान २४) या दोन कविता वत्सलरसानें ओथंबलेल्या आहेत. पैकीं, 'माझी कन्या' या कवितेंत आपल्या लाडक्या मुलीची समजूत घालणाऱ्या दरिद्री बापाची जी भावना व्यक्त झालेली आहे ती कोठल्याहि सहृदय सांसारिकाचे डोळे डबडबून टाकण्यासारखी आहे. या कवितेची उजळ रचना वाचकांच्या डोळ्यांत विशेष भरण्यासारखी आहे. विशेषत: स्फुंदून स्फुंदून रडताना निघणाऱ्या उष्ण निश्वासांनीं आपल्या मुलीच्या गालावरचे गोंडस गुलाब गोरेमोरे कसे झाले याचें हुबेहूब वर्णन करताना कवीनें जो नाजूक कोटिबाज विनोद केलेला आहे तो अतिशय हृदयंगम आहे—

उष्ण वारे वाहती नासिकांत,
गुलाबांला सुकविती काश्मिरांत! (पान १८)

नासिकाहून वाहणाऱ्या उष्ण वाऱ्यांमुळें काश्मिरातील गुलाब सुकून जात होते. *यातील 'नासिक' या शब्दावरची कोटि मार्मिक नाहीं असें कोण म्हणेल?* या संग्रहात निव्वळ तात्त्विक असें जिला नाव देता येईल अशी 'पिंगा' (पान ११) ही एकच कविता आहे. या कवितेची रचना ओघवती व नादमधुर असली आणि सकृद्दर्शनीं ती सुलभ वाटली तरी तिच्यांतील लाक्षणिक प्रतीकामुळें ती अर्थनिष्पत्तीच्या दृष्टीनें कठीण वाटल्याशिवाय राहणार नाहीं. "ह्या कवितेंत 'अहं' या शुद्ध जाणिवेचा आणि कल्पनेच्या अनंत वृत्तींचा खेळ आहे. शुद्ध 'अहं' स्फुरण तें 'मी' आणि विकृत अहंभाव म्हणजे देहभाव किंवा द्वैताचें भान हा 'पिंगा' अशी कल्पना या काव्यांत केलेली आहे"* असा कवीचा या काव्याबद्दलचा खुलासा आहे. आत्म्याच्या आणि द्वैतवृत्तीच्या अपूर्व वर्तनाचें कवीनें केलेलें वर्णन डोळ्यापुढें मूर्तिमंत चित्रच उभें करतें—

---

* 'पिंगा' कवितेच्या अर्थाबद्दल ता. ७-४-१९४७च्या पत्रात Bee लिहितात: "श्रीयुत अत्रे यांच्या प्रस्तावनेंत माझ्याकडून एक महत्त्वाची चूक झाली आहे. पिंगा या कवितेचा अर्थ असा: १ प्रकृति, २ अहंकार, ३ मन, ४ मनाच्या वृत्ति, आणि ५ चैतन्ययुक्त काया (देह)

[पृ. ३४ पाहा.

अनेक नेत्रांचें बघणें । अनेक कंठाचे गाणें
अनेक चरणाचें जाणें । अनेक चित्ताचें स्फुरणें
दृष्टी, वाणी, गती, मती । एकच येथुन तेथुन ती (पान १२)

या 'पिंग्या' मुळें सर्व भेदभाव नाहींसा झाला व आत्मा कल्पनेच्या अनंत वृत्तींशीं तदाकार झाला अद्वैताचें सामर्थ्य एवढें मोठें आहे कीं, त्यायोगानें आत्म्यानें सर्व विश्व गिळून टाकलें स्वर्गाला उचलून त्यानें पृथ्वीवर आणलें व त्याच्या डोक्यावर त्यानें नाच आरंभला देहाची जाणीव नाहींशी झाल्यावर आत्म्याला पूर्वी चिकटलेले दुर्गुण गळून पडले व स्वतःची स्वतःला ओळख झाली विश्व व आत्मा एकमेकांत विलीन झाली इतकी अभिन्नता झाली तरी आत्म्याची 'अहं' म्हणून जी शुद्ध जाणीव असते ती थोडीच नाहींशी होते ? एवंच, स्वयंपणाची शुद्ध जाणीव राखून देखील विश्वैक्यता पावणें आत्म्याला शक्य आहे, हें या काव्यात ध्वनित करण्याचा कवीचा हेतु असावा असें वाटतें शब्दमाधुर्याच्या मोहिनीला कवि बळी पडल्यामुळें या कवितेंतील प्रत्येक शब्दाचा व कल्पनेचा सुसंगत अर्थ लावणें कठीण आहे तथापि, तिच्यातील मध्यवर्ती कल्पना सुगम व हृदयंगम आहे एवढें कबूल करावयास हरकत नाहीं वेदान्तविषयातील क्लिष्ट परिभाषा व गूढ कल्पना यांची सूत्रबद्ध गुंतागुंत प्राकृत मराठी वाचकांना उकलणें कालत्रयींहि शक्य नाहीं गोविंदाग्रजांचें 'फुलांचें गाणें' किंवा केशवसुताचा 'झपूर्झा' या काव्यातील काहीं कल्पनांचा अर्थ समजावून सांगण्यास हिमालयाच्या

---

इतक्याचा मिळून पिंगा हा तरुण मुलींचा खेळ झाला आहे ही दुरुस्ती अवश्य झाली पाहिजे पुस्तक छापून आल्यावर ही चूक माझ्या नजरेस आली होती पिंगा या विषयावर एकनाथाचीं तीन आणि तुकारामाचीं दोन अशीं पाच पदें पूर्वीच प्रसिद्ध झालीं आहेत आणि माझें हें सहावें पद आहे

रा अने याच्या 'सत्कारा' तील 'पिंगा' कवितेसंबंधींचा पहिला मजकूर सोयीच्या दृष्टीनें कायम ठेवला असला, तथापि वाचकांनीं Bee यांनीं दिलेला अर्थच अधिकृत समजून ग्राह्य मानावा

गुहेंतील एखादा सिद्धपुरुषच पकडून आणावयाला पाहिजे B ० कवींच्या 'प्रिया' लाहि क्षणभर या काव्याच्या पत्तीला नवरिण्यात अन्याय होणार नाहीं आधुनिक मराठी कवितेच्या सुदैवानें या कवितेसारखा आणखी दुसऱ्या कविता लिहिण्याचा B०० कवींना मोह झाला नाहीं, हें ठीकच झालें

'प्रभात पोवाडा' (पान ६१) या कवितेच्या मूळ स्वरूपात काहींसा बदल करून ती या संग्रहात छापलेली आहे. महायुद्धाच्या वेळीं ब्रिटिश साम्राज्यावर जो आणीबाणीचा प्रसंग आला होता त्यामध्यें त्याला साहाय्य करण्यासाठीं 'लष्करात भरती' होण्याचा उपदेश कवींनीं हिंदी तरुणांना केलेला होता, अशी या कवितेची मूळ भूमिका आहे Bee कवींच्या ओजस्वी वृत्तीशीं आणि उदात्त तत्त्वज्ञानाशीं ही कविता मूळ स्वरूपात अतिशयच विसंगत दिसली असती, म्हणून लष्करभरतीसंबंधींचा सर्व भाग तिच्यातून गाळून टाकण्यात आला हें बरें झालें आता या कवितेला शिवकालीन पोवाड्याचें स्वरूप आलेलें आहे तथापि कवींनीं केलेल्या 'ऑपरेशन' चा परिणाम या पोवाड्याच्या प्रकृतीला एकदरीनें बाधलेलाच दिसत आहे त्यामुळें विचाराच्या व भावनेच्या दृष्टीनें तो अगदींच निःसत्त्व वाटतो.
'कमला' (पान ४३) ही कविता B०० कवींच्या काव्यभांडारातील कोहिनूर आहे युवराज संभाजीसारख्या शूर, दिलदार पण विषयासक्त पुरुषाकडून योरातांच्या पाककुळातील कमळेसारख्या अत्यंत प्रखर वृत्तीच्या कुमारिकेची वंचना झाल्यामुळें बेअब्रूचें जिणें कंठण्यापेक्षां मरण बरें अशा निश्चयानें तिनें आत्मनाश केला, अशी ही प्रेमवंचनाची हृदयद्रावक कथा आहे या कवितेतील विचारावर, कल्पनेवर व भाषेवर 'मराठमोळ्या' चा इतका ठळक ठसा उमटलेला आहे कीं, त्यामुळें तिच्यातील करुणरस कोणत्याहि मराठी मनांतील भावना उचंबळून टाकल्याशिवाय राहात नाहीं तथापि, B०० कवींच्या कलेचा एक उत्कृष्ट नमुना या दृष्टीनें या काव्याकडे पाहिल्यास त्यातील उदात्त व अद्भुत सौंदर्य वाचकांना विशेष प्रतीत होईल पर्वतामधून उगम पावून महासागराला मिळावयास जाणाऱ्या एखाद्या विशाल नदीच्या प्रवाहांतील भव्यता, ओघ व गतिवैचित्र्य या कवितेंत दृश्यमान होतात आधुनिक दृष्टीनें म्हणावयाचें झाल्यास हा कविता एखाद्या उत्कृष्ट बोलपटाप्रमाणें भासते कारण त्यातील निरनिराळ्या दृश्यांची व

प्रसंगाची 'फोटोग्राफी' इतकी सुंदर वठलेली आहे कीं, तरी एखाद्या कुशल कॅमेरामनलाहि साधावयाची नाहीं नभ शिखरावर चढता चंद्राची कोर चमकत आहे, निसर्गाचा धडधडता प्राण आणि निशासमयीं निश्चल झालेला आहे मात्र शिवनेरी किल्ल्यावरील प्रासादाच्या गवाक्षाचे दार उघडे आहे आणि तेथें ही कोण उभी दिसत आहे!—

फोमल आहे कोणी श्यामा चिंताकुल वसली
लावण्याची किशोरगंगा वाट काय चुकली?

हीच ती थोरातांची कमळा! तिची तेजस्वी श्यामल कांति निळ्या साडीमधून वाहणाऱ्या मोत्याच्या पाण्यासारखी दिसत आहे तिचे केश मोकळे असून तिच्या गालावर कर्णभूषणाची छबी पडलेली आहे तिच्या डोळ्यापुढून आपल्या गत आयुष्याचा चित्रपट सरकत होता कपटी संभाजीनें गणगोतांमधून आपल्याला काढून या बंदिवासात कसें आणून ठेवलें तो सर्व प्रसंग तिला आठवला एका सायंकाळीं गावाबाहेर निसर्गशोभा पाहात ती बसली असताना शिकारीच्या पोषाखात युवराज त्या ठिकाणीं अकस्मात् आले

अबलख वाजी, केस मुर्की, उत्सरळ गति त्याची
घामानें वर डवडवलेली मूर्ति स्वाराची
लाल नयन, मुख लाल, करीं समशेर लालजाल
वेष शिकारी, उन्मादें मन झालें बेताल!

अशा मनःस्थितींत, कमळेचें विकसोन्मुख लावण्य पाहून संभाजी मोहित झाला त्यानें ताडकन् घोड्यावरून खालीं उडी मारली व तिचा हात धरला पुढें काय झालें तें कळण्याच्या मनःस्थितींत कमळा असणें शक्य नव्हतें. पण कवीनें त्या प्रसंगाचें अगदीं चित्रून वर्णन केलें आहे—

कान्तकपोलप्रान्ता उन्मत्तानें चुंबियलें—
विशुद्ध पुष्करणीचें पाणी विषसकुल केलें
तव तन्वंगा विळखा पडला त्या अधमांगाचा
चंदनविटपा जसा लपेटा जहरी सर्पाचा!

विवाहाची खोटी आशा दाखवून संभाजीनें तिला पळवून नेलें व शिवनेरी किल्ल्यावर बंदिवासात ठेवलें. वडिलांच्या मनातहि तिचा संभाजीशीं विवाह व्हावा असें होतें. आणि तिलाहि तो आवडत नव्हता असें नव्हतें. पण विधिविरहित आलिंगन व चुंबन तिच्या देहाला घडल्यामुळें तिच्या कौमार्यावर जो कलंक आला होता तो विवाहामुळें काहींसा धुतला जाईल या आशेवर ती दिवस कंठीत होती. पण शेवटीं तिची फसगत झाली. संभाजीनें आपल्या वचनाला हरताळ फासला आणि लग्नावाचून तसेंच आपल्याजवळ तिनें राहावें असा त्याचा मानस असलेला तिला दिसून आला.

थोरातांच्या पाक कुळीं जी जन्माला आली
रांड म्हणुनि घ्यायाचें आलें आज तिच्या भाळीं !

असलें लाजिरवाणें जिणें कठण्यापेक्षां मरण बरें असा कमळेनें निश्चय केला. मात्र आपल्या शुद्ध शीलाबद्दल कदाचित् आपली माता संशय घेईल या ओझरत्या शंकेनें कमळेचें हृदय अत्यंत व्याकुळ होत होतें.

म्हणोत जन, पण म्हणूं नको तूं गे माझे आई !
'कुळबुडवी कारटी कशाला जन्माला येई ?'

अशी मनातल्या मनात तिनें आईची आळवणी केली व देह शुद्ध नसला तरी चित्त तरी शुद्ध आहे असल्या भ्याड सबबीखालीं स्वतःच्या जिण्याचें समर्थन करण्यापेक्षा आलेल्या आरोपाचें परिमार्जन आपलें शुद्ध रक्त ओतून मरण्यासाठीं तिनें त्या गवाक्षातून खालीं असलेल्या दरींत उडी घेतली. Bee कवींच्या अम्लान प्रतिभेचें लावण्य या कवितेच्या ओळीओळींत व शब्दाशब्दांत भरून साठत आहे कीं काय असें वाटतें. ऐश्वर्यात्मक उदात्त सौंदर्याला या काव्यात अगदीं ओथंबून बहर आलेला आहे. ही कविता वाचताना आपण महाबळेश्वराच्या एखाद्या उच्च शिखरावर बसून भोंवतालीं उपड्यावर पडलेल्या सौंदर्याच्या राशीच्या राशी अवलोकीत आहों असें वाटतें. या कवितेंतील सुंदर स्थळें वेंचावयाला दहापाच परळ्या कादीं पुन्हा पडावयाच्या नाहींत.

Bee कवींच्या चार कविता भाषांतरित आहेत. सामान्यतः भाषांतरित कविता म्हटल्याबरोबर रसिकांच्या भुवयांना मुरड पडते आणि तें साहजिकच आहे. कारण इंग्रजी कवितांची मराठींत झालेलीं बहुतेक भाषांतरें हीं माल्य-स्तोमविधीनें पाश्चात्य विचारांचीं बाह्यात्कारीं केलेलीं हिंदू करणें होत. त्यामुळें भाषांतरित मराठी काव्यें हीं मुक्तिफौजेंतील धोतरपटका पेहरलेल्या साहेबामारखीं चमत्कारिक दिसतात. Bee कवींची भाषांतर करण्याची अशी धेडगुजरी पद्धत नाहीं. मुळांतील कवितेमधल्या कल्पनेशीं व विचारांशीं ते इतके समरस व तल्लीन होतात कीं, त्यामुळें त्यांतील अत्यंत ओझरत्या छटादेखील त्यांना सुलभ व प्रासादिक वाणींत व्यक्त करतां येतात. त्यामुळें त्यांची कविता भाषांतरित आहे असें न वाटतां देखील मूळचें ध्वनिसंगीत कायम राहतें. परकीय काव्याचें भाषांतर करण्यास देखील जी एक विशिष्ट प्रकारची प्रतिभा लागते ती Bee कवींच्या जवळ असल्यानें मराठी कवितेच्या न्यायकोर्टांत कधीं काळीं जर एखाद्या 'पौरस्त्य भाषांतरकारा'ची जरूर लागली तर त्या जागेला Bee कवींइतका लायक अधिकारी दुसरा सांपडणार नाहीं. 'बडवाला' (पान ७४) ही कविता त्यांच्या या गुणाची उत्कृष्ट साक्ष देऊं शकेल. स्कॉटच्या 'रोक्बी' काव्यांतील तिसऱ्या सर्गांत एडमंड जें गाणें म्हणतो त्याचें हें भाषांतर आहे.

> O, Brignall banks are wild and fair
> And Greta woods are green

ह्या त्या गाण्याच्या हृदयंगम पालुपदापेक्षांदेखील Bee कवींनीं त्याची केलेली मराठी प्रतिकृति अधिक नादमधुर आहे.

> शोभिवंत भीवरातीर गंभीर नीर वाहतें
> अफाटचि हिरवट वन भोंवतें

'We dwell by dale and down' या ओळीचें 'दऱ्या आणि दरकुटींत आम्ही क्रमिनों दि-यामिनी। यातलें मर्म समज कामिनी!' हें अनुप्रासासह केलेलें ठसकेबाज रूपांतर किंवा 'And when I am with my comrades met beneath the greenwood bough' या ओळींमधील कल्पनेचें 'विस्तारितविपिनराटिकेनिकट विस्तृत रिटांच्या

रळीं । मंग्ळी मिळते टोळींतली ॥' या पद्यांत अधिक ठळकपणानें रंगविलेलें चित्र, हें Bee कवींच्या भाषांतरकौशल्याचे उत्तम नमुने आहेत. मूळ इंग्रजी कवितेशीं Bee कवींचीं रूपांतरें ताडून पाहण्यांत फारच स्वारस्य येतें व हा उद्योग वाचकांनीं जरूर करून पाहावा. एकदरीत Bee कवींच्या प्रतिभेचा हाहि पैलू तेजस्वी आहे, हें कोणालाहि मान्य करावें लागेल.

आतापर्यंत निरनिराळ्या कवितांच्या आधारें Bee कवींच्या काव्याचें सविस्तर विवेचन केलें. उत्कृष्ट कवींच्या वाङ्मयांत विस्तार व महत्त्व यांचें प्रमाण व्यस्त असतें या सत्याचा प्रत्यय Bee कवींच्या कवितेंत येतो. त्यांचीं काव्यें संख्येनें अत्यल्प असलीं तरी त्यांच्या गुणांचें महत्त्व फार आहे. दर कवितेत्वितेमधून त्यांनीं आपल्या कलाकौशल्याचें सारसर्वस्व ओतलेलें आहे. त्यांच्या काव्याचें समालोचन करतांना एकाच श्रेष्ठ कलाकृतीच्या परिपूर्णतेसाठीं आपलें सारें जीवन खर्ची घालणाऱ्या प्राचीन कारागिराची स्मृति होते. हस्तिदंताच्या एका लहानशा तुकड्यावर नारीक हत्याराच्या टोकानें दिवसचे दिवस सूक्ष्म नकशीकाम कोरीत बसणाऱ्या एखाद्या नादी कलावंताप्रमाणें आपल्या कवितेची रचना सर्वांगसुंदर कशी करावी या निदिध्यासांत Bee कवींचे महिनेचे महिने जात असावेत असें वाटतें. त्यामुळेंच त्यांच्या हातून विपुल कवितानिर्मिति होऊं शकली नाहीं. कारखानदारापेक्षां कारागिराची कीर्ति अधिक चिरस्थायी असते किंवा गांवोगांव धर्मशाळा आणि डाकबंगले बांधणाऱ्या पी. डब्ल्यू. डी. पेक्षां एकच ताजमहाल बांधणाऱ्या शहाजहानचा लौकिक अधिक काळ टिकेल, हें सांगण्यास ज्योतिषाची जरुरी नाहीं.

इतर कवींशीं तुलना केल्यानें Bee कवींचें वैशिष्ट्य चटकन् नजरेंत भरतें. केशवसुतांच्या काव्यांत ओजस्वी तत्त्वज्ञान आहे, पण कलेचा रेखीवपणा नाहीं, गोविंदाग्रजांच्या काव्यांत कला व सौंदर्यप्रीति आहे पण जीवितासंबंधीचा सुसंगत विचार नाहीं. रे. टिळकांच्या काव्यांत साधेपणा व प्रेमळपणा आहे पण कल्पनेची विशालता व ऐश्वर्य नाहीं; बालकवींच्या काव्यांत नादमाधुर्य व तत्त्वसंशोधनाचें वेड आहे, पण सत्याचा स्पष्ट प्रकाश नाहीं—या साऱ्या दुर्मिळ गुणांचा समुच्चय Bee कवींच्या कवितेंत

आल्दून येतो कलावत, तत्त्वज्ञ व सौंदर्यवादी कवि या नात्यान आधुनिक मराठी कवींमध्यें Bee याचें स्थान फार मानाचें आहे

कल्पनेची भव्यता व विशालता हें Bee कवींच्या कलेचें एक महत्त्वाचें वैशिष्ट्य आहे त्यांच्या प्रतिभेचा आवाका फार दांडगा आहे 'उडुगणांच्या यानीं। बसुन विश्वाची राणी। अनंताची प्रदक्षिणा करी–ग' हें 'वेल्हाळ्या' तील प्रतिभेचें वर्णन, 'वात्सल्य' या कवितेमधील 'या विश्वकंदरीं तेविं मातृ निंदूतें। शिशुरिंदु मिळे जगदंबदयामृतवातें' ही मातावालकांच्या मीलनाची मनोहर मीमांसा, 'अफाट जगद्वाटात हिंडून' हिरमुसी झालेल्या कवि वाळाला सृष्टिमातेनें 'चंद्रसूर्य खेळणीं दिलीं खेळाया तेजागळीं' ही कल्पना किंवा 'हृदयाचा अम्बरडंबर अंबर पदर दूर सारुन। विशाल वक्षीं घट्ट धरी मग कवीस कवटाळुन' हें सृष्टि आणि कवि याच्या संमलनाचें वर्णन एवढ्या उदाहरणावरून Bee कवींच्या अचाट कल्पनाशक्तीचें वाचकांना स्वरूप कळून येईल

त्याचा शब्दसंग्रह वेचक व घोटीव असल्यानें त्याच्या कवितेच्या ओळी एखाद्या टपोर मोत्याच्या माळेप्रमाणें घोसदार व सूत्रबद्ध वाटतात त्यांच्या काव्यांत ध्वनिसंगीतापेक्षां रंगसौंदर्य अधिक आहे, त्यामुळें त्यांची कविता वाचतांना आपण एखाद्या चित्रकाराच्या 'आल्बम' चीं पानें उलटत आहों असें वाटतें निरनिराळ्या प्रसंगाचीं व दृश्याचीं ठळक व रेखीव शब्दचित्रें काढण्यात ते कुशल आहेत हवा तेवढाच रंग कुंचलीच्या टोकावर घेऊन किंवा तो दुसऱ्या रंगात मिसळून एखादा चित्रकार ज्याप्रमाणें आपल्या चित्रात अतिशय सूक्ष्म रंगच्छटा वठवूं शकतो, त्याप्रमाणें योग्य तेवढेच शब्द घेऊन किंवा त्याची इतर शब्दाशीं रंगसंगति जुळवून ते कल्पनेच्या अगदीं सूक्ष्म छाया भाषेंत व्यक्त करू शकतात 'कमला' काव्यात Bee कवींचें हें वर्णनकौशल्य अगदीं पराकाष्ठेला पोहोंचलेलें आहे आपल्या सामर्थ्यवान बाहुपाशात दानवेपणानें विरहून समाजीनें कमळचें उन्मत्तपणानें जें चुंबन घेतलें व त्या यातनेच्या अनुभवानें कमळेच्या मनाची जी बेभान स्थिति झाली तिचें कवीनें केलेलें वर्णन अप्रतिम आहे तें वाचतांना आपण शब्द-काव्य वाचीत नसून एखाद्या चित्रपटातलें दृश्य पहात आहों असें वाटतें—

हिरवे, पिवळे, लाल, गुलाली रजनीचे रंग
पटपट बदलुनि निवळुनि झालें नितळ तिचें अंग
भानावर आलें तों दिसली, पाहि जंव भंवतीं
काळोखाच्या बुरख्याखालीं दडलेली जगती !

कमळेनें आत्महत्या केल्यानंतर निसर्गाला विद्युल्लतेचा जो क्षणार्ध झटका बसला त्याचें चित्र रेखाटतांनाहि पिरून कवींनीं चित्रपटाच्या तंत्रांचा अवलंब केलेला आहे—

क्षणैक हलकी शरच्चंद्रिका पुनश्च सहितवन
क्षिप्र अनन्तीं नितान्त विश्वप्राण होय लीन !

'माझी कन्या' या काव्यांतील आपल्या लाडक्या मुलीच्या डोळ्यातून होणाऱ्या अश्रुपातावें पुढील वर्णन—

शुभ्र नक्षत्रे चंद्रचांदण्यांची
दूड रचलेली चिमुकली मण्यांची
गडे ! भूईवर पडे गडबडून,
कां ग आला उत्पात हा घडून ?

किंवा तिच्या विकसोन्मुख लावण्याचें रेखाटलेलें चित्र—

लाट उसळोनी जळीं खळे व्हावें,
त्यांत चंद्राचें चांदणें पडावें;
तसें गालीं हासतां तुझ्या व्हावें,
उचंबळुनी लावण्य वर वहावें !

हीं वर्णनें अत्यंत हृदयंगम आहेत.

'चांदणी'च्या सौंदर्यदर्शनानें निसर्ग किती मोहित झाला होता तें वर्णनहि रम्य आहे—

तिचें तें उदित तेज पिउनी । जनवन गेलें वहकोनी
प्रौढपण निज निपट त्यजुनी । बनली पोरच जणुं धरणी !

गिरि गंभीरपणा त्यजुनी । पाहतो शिर वरवर करुनी.
नेत्रपुट तृण झटपट मिटुनी । सिळले चुळबुळ विसरोनी.

शेवटची ओळ तर भरारीची आहे. तसेंच, सृष्टि व कवि याच्या अभिन्नतेचें वर्णन—

हा हासतां हसते ती अथवा हा रडतां ती रडे
पहाट फुटते हा उठतां, हा निजतां झापड पडे !

*यापेक्षां अधिक कौशल्यानें किंवा हृदयंगम तऱ्हेनें कोणत्या कवीला करतां* येईल ?

जुन्या वाङ्मयांतील पदें, लावण्या व पोवाडे याजवर Bee कवींचा केवढा व्यासंग आहे हें त्यांनी त्यांमधून निवडून काढलेल्या टळक व सुंदर शब्दांवरून व वाक्प्रचारांवरून कळून येतें निरगुळ, निवळ, निवट, हुवर, महामूर, अनुमाळ, राणीव, डरण, गदारोळ, चैनशिरणें, तेवतमाळ हे शब्द किंवा स्वानंदाचें लिंबलोण उतरणें, अंतरंग ओथवुनि ओसंडणें, विलासाची मोगरी होणें, दीतीनीं दुकुलें लेणें, रेशमाचा करपाश गळा घालणें, दिठीं दीठ मिळणें, गात्रें पागळणें, चाफा फुलीं फुलून येणें, चित्तवृत्ति चाकाटणें किंवा मराठ्याचा वेल बहता होणें इत्यादि वाक्यचार Bee कवींच्या उपरोक्त परिशीलनाची खात्री पटवून देतील.

शेवटीं, आतां Bee कवींच्या कवितेवरील एका महत्त्वाच्या आक्षेपाचा विचार करणें जरूर आहे. त्यांची कविता विषयाच्या व रचनेच्या दृष्टीनें पुष्कळ ठिकाणीं क्लिष्ट, दुर्बोध व संस्कृतशब्दप्रचुर आहे असें विधान केलेलें पुष्कळदा ऐकूं येतें नर्मदेच्या पात्रांतील संगमरवरी खडक दिसायला अत्यंत शोभिवंत दिसत असले तरी चढावयाला बिकट आहेत, तशीच स्थिति Bee कवींच्या काव्याची आहे असें कित्येक टीकाकारांचें मत आहे. या आक्षेपांत सत्याचा कितपत अंश आहे याचें विवेचन करणें आवश्यक आहे विषयाच्या दृष्टीनें विचार करतां 'पिंगा' या कवितेचा काहीं भाग वगळ केल्यास Bee च्या इतर कवितेंत विषयाचें काठिन्य आहे असें म्हणतां येणार नाहीं. कित्येक वेळा तत्त्वज्ञानाची परिभाषा योजण्याकडे त्यांची प्रवृत्ति असल्यामुळें

सामान्य वाचकांना तो भाग दुर्बोध वाटणें शक्य आहे. उदाहरणार्थ, 'वेड-गाणें' या कवितेंतील 'दिव्य भोगाच्या खाणी । गाय मनोमय वाणी । कशी वदेल राठ वैखरी ग' या ओळींचा अर्थ कळावयास वाचकाजवळ पूर्वज्ञानाची पुष्कळच सामग्री असावयाला पाहिजे हें उघड आहे. वासनानंद, विद्यानंद व शुद्ध विषयानंद या दिव्य भोगाच्या खाणी असून परा, पश्यन्ती, मध्यमा व वैखरी अशा चार वाणी आहेत. परा वाणी ही पराकाष्ठेची सूक्ष्म, अत्यंत मधुर, परमानंददायक व निव्वळ अनुभवरूप आहे. पुढील तीन वाणींत माधुर्याचा कमी कमी व जडाश अधिकाधिक होत गेलेला आहे. पहिल्या दोन वाणी सामान्य माणसास प्रतीत होत नाहींत. मध्यमा व वैखरी या दोनच वाणींचें आपणास ज्ञान होऊं शकतें. मनोमय वाणी म्हणजे मध्यमा; विषयाची स्पष्ट कल्पना येऊन मनातल्या मनात जी अस्पष्ट गुणगुण चालते ती. वैखरी ही शब्दरूप असल्यानें ती सर्वांत जड आहे म्हणून तिचें स्थान शेवटचें आहे. मनोमय वाणीनें अनुभवलेल्या आणि गायिलेल्या विषयाचें यथातथ्य वर्णन वैखरी कशी करूं शकेल ? अशी भारतीय अध्यात्म-शास्त्राची विचारसरणी आहे. 'वैखरी' ला 'राठ' हें विशेषण योजण्यांत कवीचें औचित्य दिसून येतें. इतकें या ओळींचें स्पष्टीकरण केल्यानंतर सहृदयांनी त्यांच्यात भासणारी क्लिष्टता व दुर्बोधता तावडतोब विरघळून जाते व त्यांतील माधुर्य प्रतीत होतें. सुशिक्षित म्हणून समजल्या जाणाऱ्या आजच्या प्रत्येक वाचकाला त्याच्या धर्मांतील तत्त्वज्ञानाचें सामान्य ज्ञान आणि ठळक पारिभाषिक शब्दांची ओळख असली पाहिजे अशी Bee कवींची अपेक्षा आहे, आणि ती गैर आहे असें कोण म्हणेल ? घरबसल्या आपणास सर्व गोष्टी सुलभ करून मिळावयाला पाहिजेत अशी इच्छा आजच्या आळशी वाचकवर्गांत दिवसानुदिवस बळावत चालली आहे. कोणतीहि गोष्ट कळून घेण्यास त्यांना श्रम करावयाला नकोत. हातानें स्वयंपाक करण्याऐवजीं खाणावळीचाच रस्ता धरण्याचा आजचा काळ आहे. ही स्थिति इष्ट आहे असें म्हणवत नाहीं. Bee सारख्या कवींचें काव्य कळा-वयाला वाचकांनींहि परिश्रम करून आपला अधिकार वाढवावयाला नको का ? वाचकाच्या या कर्तव्याचा इतर वाङ्मयाच्या बाबतींतहि अधिक विस्तारानें विचार व्हावयाला हवा.

कित्येक लेखकांच्या क्लिष्टपणाच्याहि रचना चुकीच्या असतात. विषयाचें काठिन्य, विचारांचा गोंधळ, विस्कळित रचना व साहित्यांत रूढ न आढळणाऱ्या ओबडधोबड संस्कृत शब्दांची योजना या दोषांमुळें लेखनांत क्लिष्टपणा येतो. Bee कवींच्या काव्यांत विचारांचा गोंधळ किंवा विस्कळित रचना हे दोष आहेत असें त्यांचा कट्टा टीकाकार—एखादा 'विशाळ मणिगोटा'—देखील म्हणणार नाहीं! Bee कवींच्या शब्दयोजनेसंबंधीं मात्र असें म्हणतां येईल कीं, कधीं कधीं ती खरोखरच कठिण व बिकट असते 'प्रसंगीं अरण्या प्रकर्षभर ये ज्याच्या पुरा मोडुन' किंवा 'माधा यातें अविफल जगद्व्याळ सद्ध्येयसिद्धि। लागे तत्तुल्यचि अति बृहत् साधनांची समृद्धि' अशा विनाकारण अवघड बनविलेल्या ओळी किंवा 'दिव्यतेजविभ्रमाभनवाली, भूभृतरत्नकावृतवनखडी, स्वैरालापमनोज्ञभाव निरहा' असले शिसवीच्या लाकडाचे बनवलेले दणकट समास पाहिले म्हणजे Bee कवींच्या काव्याला क्षणभर थट्टेनें 'वह्व चर्म, गाठानीं भरलें!' असें त्यांच्याच शब्दांत म्हणण्याचा मोह होतो लांबलांब कुतुबमिनारी समास बनविण्याचा Bee कवींना फार नाद आहे. पण आनंदाची गोष्ट एवढी कीं, त्यांच्या या दीर्घ समासांतील बहुतेक शब्द सोपे व विग्रह करतां येण्यासारखे असतात उदाहरणार्थ, 'नरनारीरत्नाचा आकर महाराष्ट्रदेश। कलविद्याचापल्यशीलशोभेचा अधिवास' किंवा 'विकसोन्मुखलावण्य-शुद्ध शालिन्यसुगुणशाली' अथवा सुंदर मंजुल मधुमृदुल। भूति नव-मुद-मंगल मूल' आणि 'विश्वीं या सहवाससौख्यसलिलस्नातांग सारें जरी' या ओळींतील समास दुर्बोध आहेत असें कोणाला म्हणवत येणार नाहीं. मात्र, या समासनिर्मितीच्या नादामुळें पुष्कळ वेळां अत्यंत हास्यास्पद असे यतिभंग झालेले आढळून येतात तथापि Bee कवींचें रूपाइतकें नादाकडे लक्ष नसल्यामुळें त्यांना त्या दोषाची तितक्या तीव्रतेनें जाणीव होत नसावी

एखादी कल्पना जर मोजक्या शब्दांत व्यक्त करून दाखवितां येण्यासारखी असली तर तिच्यासाठीं शब्दांचा निष्कारण विस्तार वाढविण्याची Bee कवींची प्रवृत्ति नाहीं इतर कवींप्रमाणें ओळी वाढवीत नेण्याचा त्यांना नाद नाहीं ध्वनि, सूचना, व्यंगार्थ या अर्थप्रकटीकरणाच्या साधनांचा त्यांनीं आपल्या काव्यांत उपयोग केलेला आहे एकदेखील अनवश्यक व वायफळ

शब्द आपल्या कवितेंत येऊ नये याबद्दल आपण आटोकाट काळजी घेत असतों, असें त्याचें म्हणणें आहे. म्हणूनच एखादा महत्त्वाचा शब्द लक्षात आला नाहीं तर त्या स्थळाचें तरल सौंदर्य अथवा अर्थसौरस्य दृष्टींतून सहज निसटून जातें. कमींत कमी शब्द खर्च करून जास्तींत जास्त सौंदर्य व्यक्त करण्याच्या Bee कवींच्या हव्यासामुळेंच त्याच्या कवितेंत साधेपणा सापडत नाहीं. बाकी, भाषेचा साधेपणा म्हणजे नेमळटपणा किंवा अजागळपणा नाहीं एखाद्या खेडवळ व बावळट मुलीच्या सौंदर्याची स्तुति फक्त काव्याच्या सृष्टींतच होत असते. व्यवहारात नीटसपणा, रेखीवपणा व ठाकठिकी अमन्याशिवाय सौंदर्याला कोणी किंमत देत नाहीं. साधेपणात सौंदर्य नाहीं असें नाहीं पण त्याच्याशीं उदात्त गुणाचा समन्वय झाला तरच त्याचें महत्त्व! खादीची पाढरी स्वच्छ टोपी मोतीलाल नेहरूंच्या डोक्यावर शोभिवंत दिसली तरी ती एखाद्या ग्रामगाधीच्या डोक्यावर अजागळपणाच्या निशाणी-सारखीच भासते. Bee कवींच्या काव्यात विषय, विचार व भाषा यांचें ऐश्वर्य व वैभव पाहावयास मिळत असल्यानें त्यांच्या सौंदर्यांत साधेपणापेक्षा भव्यता व उदात्तता हेच गुण मनाला विशेष पटतात. कै. अच्युतराव कोल्हटकर हे रे. टिळकांच्या काव्याला कौतुकानें 'पाटलाची पोर' असें म्हणत. त्याच चालीवर म्हणावयाचें झाल्यास असें म्हणता येईल कीं, Bee कवींची कविता ही सोन्याच्या साखळ्या पायात घालून सगमरवरी जिन्या-वरून उतरणारी एखाद्या मराठा राजघराण्यातील तेजस्वी राजकन्या आहे. अखेर, Bee कवींच्या मनोहारिणी कवितेचें त्यांच्याच शब्दात असें वर्णन करतां येईल—

पदन्यास लावण्यपान्तीं ही करिते रमणी
तारामंडित निरभ्रांवरीं जशी रम्य रजनी!
शुभ्रकृष्ण वर्णांतिल सारी मोहकता आली
नेत्रीं, गात्रीं, एके पात्रीं, हृदयगम मेळीं!

पुणें, ता. १० जुलै १९३४. प्रल्हाद केशव अत्रे

# पिकलें पान

'फुलांची ओंजळ' पुस्तकाची प्रथमावृत्ति १९३४ मध्यें प्रसिद्ध झाली. त्यानंतर कै. Bee यांनी ज्या एकूण अकरा नवीन कविता लिहिल्या, त्या प्रस्तुत द्वितीयावृत्तींत 'पिकलें पान' या शीर्षकाखालीं स्वतंत्र विभागात संग्रहित करण्यात आल्या आहेत. या विभागावर मीं प्रस्तावनेदाखल चार शब्द लिहावे, अशी द्वितीयावृत्तीच्या प्रकाशकांनीं इच्छा प्रदर्शित केल्यावरून तसें थोडक्यांत करीत आहे.

या अकरा कवितांपैकीं, 'गाविलगड' कविता 'प्रतिभा' पाक्षिकाच्या १९३५ च्या विशेषांकांत प्रसिद्ध झाली होती. अर्थात् ती त्याच सुमारास केव्हा तरी लिहिली गेली असली पाहिजे. उरलेल्या दहा कविता 'युगवाणी' मासिकासाठीं १९४५–४६ मध्यें लिहिल्या गेल्या व त्या त्यातच १९४६ मध्यें प्रसिद्ध झाल्या. 'गाविलगड' वगळल्यास इतर कविता कालानुक्रमानें दिलेल्या आहेत.

'गाविलगड' लिहितांना Bee हे वृद्ध होते, पण विकलांग नव्हते. परंतु उर्वरित कविता लिहितांना तर ते जवळजवळ प्रति मिन्दनच झाले होते! अर्थात् या कवितांत Bee यांच्या प्रतिभेची पूर्वीची चमक दिसून न आल्यास त्यांत आश्चर्य तें कोणतें? विकलांग व जराजर्जर अवस्थेंत कवि प्रतिभा मदतेज व्हायचीच!

गुणवत्तेचें एक असो, पण इतर कैक नात्यांतीत या अकरा कविता पूर्वीच्या 'Bee'ची आठवण करून देतात. हेंच पाहा ना! Bee कवि म्हटलें कीं त्यांची तत्त्वचिंतनाची आवड ही आलीच! त्याचें वैशिष्ट्य या विभागातील कवितांत कुठें कुठें उमटलेलें आहे. 'गाविलगड'च्या पूर्वार्धात सातपुडा पर्वतावरील 'आश्रमशील' जीवसृष्टीचा उल्लेख होतो न होतो, तोंच कवि अंतर्मुख होऊन तत्त्वचिंतन करूं लागतात! 'गाविलगड'चा हा

पूर्वार्ध अर्थदृष्ट्या दुर्बोध वा गूढ नसूनहि 'प्रतिभे'चा १९३५ चा विशेषांक प्रसिद्ध झाला तेव्हा या कवितेवर प्रतिकूल टीका झाली होती ! 'भारतीय जीवन', कवितेमधील 'कर्म', 'जीवन' वगैरेंच्या व्याख्या, किंवा 'अध्यात्म' कवितेंतील 'अध्यात्म' हें 'शास्त्र' का मानावें हा मुद्दा हीं Bee यांच्या चिंतनशीलतेचींच द्योतक होत. त्याचा स्वदेशाभिमान व भारतीय संस्कृतीबद्दलचा अत्यादर 'दोन मी', 'भारतीय जीवन' व 'प्रतिमाभंग' या कवितात प्रगट झालेला आहे. अणु-परमाणूंवर वर्चस्व गाजविणारी पाश्चिमात्य संस्कृति केवढाहि बुद्धिविकास दाखवीत असली, तथापि ती मानवता विरोधी असल्यामुळें हिंदुस्थानच्या दृष्टीनें कुचकामी ठरते, असा स्पष्ट अभिप्राय त्यांनीं 'दोन मी' कवितेंत व्यक्त केला आहे.

Bee हे केवढेहि तत्त्वजिज्ञासु वा संस्कृतिप्रेमी असले, तरी पण त्याचा पिंड मुळात कवीचा होता हें सत्य विसरता कामा नये. ते जन्मजात कवि होते याचाच अर्थ हा कीं, ते अभिजात रसिक होते. त्यांची ही रसिकता 'आठवण', 'प्रीति' व 'रूपमुग्धा' या कवितात निदर्शनास येते. अखेरच्या कवितेंत त्यांनीं एका मुग्धेच्या 'नारीतरुणी'चा पूर्णोदय वर्णिला आहे. पचाहत्तरींतील कवीला अशा विषयातहि गोडी वाटावी, यावरून त्याची चिरतरुण रसिकताच व्यक्त होत नाहीं काय ?

Bee यांचा पिंड कवीचा असल्याची साक्ष त्यांच्या अकरा कवितांतील भाषासौंदर्य व काहीं ठिकाणचें कल्पनासौंदर्य यावरून पटते. या सर्वच कवितांवरून त्यांच्या भाषाप्रभुत्वाबद्दल आपली एकवार प्रत्यय येतो. तसेंच, पुढील चरणांतील कल्पनासौंदर्य पाहा—

क्षितिजाच्या कंकणीं ललित लघु तारा जणुं विमल
वेलीच्या पालवींत फूल

— 'गाविलगड'

अशा तऱ्हेच्या कमीअधिक सुंदर कल्पना आणखीहि दोन तीन स्थळीं आलेल्या दाखवून देतां येतील.

एकंदरीनें 'पूर्वीच्या Bee' चें स्मरण करून देणारीं कित्येक वैशिष्ट्यें या विभागातील कवितांत दृग्गोचर होतात. आतां त्याचें प्रमाण कमी

असल्यामुळें त्या मानानें गुणवत्ताहि कमी झाली आहे, ही गोष्ट वगळी तरी देखील 'विर्ले पान,' 'भारतीय जीवन', 'एक हृदय' व 'रसमुग्धा' या कविता पुष्कळच वरच्या प्रतीच्या आहेत, असें म्हणावयास हरकत दिसत नाहीं. 'गाविन्गन' ह Bee यांच सकल्पित खंडकाव्य असून तें २००० आळींचें व्हावयाचें होतें! तें पूर्ण होतें, तर मराठींत एका अत्युत्कृष्ट खंडकाव्याची भर पडती! या अकरा कवितात काव्यदृष्ट्या निखालस निकृष्ट अशी एकच कविता आहे व ती 'दोन मी' ही होय!

मात्रावृत्तांतच सुरू करण्याची Bee यांची 'खोड' या विभागातील कवितातहि क्वचित दिसून येते! येथें एकच उदाहरण देतों• 'आठवण' ही कविता साकीमध्यें आहे, पण तींतील 'बंदींतून वाराही सुटला' हा व त्यापुढील चरण हे मात्र फटक्यांत आहेत! Bee हे अशा छंददोषाबद्दल स्पष्टीकरण देत तें असें "यतिभंग, मात्रादोष माझ्या हातून निष्काळजी पणानें झाले नाहींत मला मात्रा कळत नाहींत, मात्रा मोजता येत नाहींत, असें कमें वरें म्हणता येईल! एवढेंच कीं, दुसऱ्या कशाच्यापेक्षा तरी मी त्यांना जास्त महत्त्व देत नाहीं!" (ता २६-१०-१९४५ चें पत्र) Bee यांनीं छंदोविषयक शुद्धतेपेक्षां 'दुसऱ्या कशाला तरी' अधिक महत्त्व दिलें, हें तत्त्वदृष्ट्या योग्यच झालें पण या विभागामधल्या कवितात आढळणारे छंदोदोष समर्थनीय आहेत, असें मला निष्कूल वाटत नाहीं! छंदोदोषाची तरफदारी करण्याच्या 'जागा' निराळ्याच असतात!

मला वाटतें, अकरा कवितांच्या या चिमुकल्या विभागाबाबत अधिक विस्ताराची आवश्यकता नाहीं या विभागात अद्वितीय अशी एकहि कविता नाहीं व त्यावरून Bee यांच्या प्रतिभेचा कोणताहि नवा पैलू नजरेस येत नाहीं हें खरें, तथापि Bee यांना त्याची काव्यशक्ति अखेरच्या क्षणापर्यंत सोडून गेली नव्हती आणि त्यांनीं स्वतःशीं प्रांजल राहून काव्यरचना केली, या दोन गोष्टी या विभागावरून निदर्शनास येतील तेवढें त्यांचें महत्त्व रसिकांनीं कबूल केलें तरी पुरें आहे

*यवतमाळ ( वऱ्हाड )*
ता ३-९-१९४७

वामन नारायण देशपांडे

१

## नांवांत काय आहे ?

का आग्रह ? रसिका ! नांव सांग मज म्हणसी,
नांवांत मोहनी भासो सामान्यासी !
घननीलमणिप्रासादचंद्रशाळांत,
ते असंख्य सुंदर तारे चमचमतात,

अनिवार इंद्रजाळातें— टाकिती,
वसुधेस मंत्रमुग्धेतें— भ्रमविती,
संगूढ नेत्रसंकेतें— वाहती,

हे विलास हरिती वस्तुजातहृदयासी,
वद ! त्यांचीं नांवें काय पुसाया जाशी ?
तरुलता प्रसूनान्विता राहती रानीं,
संपूर्ण भारिती वनश्रेणि गंधानीं,

ह्या प्रमदवनांतरिं शिरले— जे जन,
तरुलताचि अंगें झाले— आपण,
निज नामरूपही गेलें— विसरुन,

आनंदसमीरण डोल देतसे त्यासी,
टपटपा पडति खालतीं लूट कुसुमांसी !

• • •

## २

# कविवंदन

कविजनसंस्तुत काव्यदेवते वंदन तव पायीं
क्षराक्षराचे जननी, व्यक्त प्रणवाचे आई !
'वाल्मिकींचा' जीवननिर्झर जाता ओसरुनी
दूर्वांकुरपुष्पाची त्यावर चादर पसरूनी,
चंदेरी दरियाचे काठीं प्रेमप्रळयात
*निजल्या 'रमा' अक्षयतेच्या वेष्टुनि शेल्यात,*
*ह्या दोघा रस-रमा घेउनि अंतर्हित होशी*
कोठें ? मागें टाकुनि उघडा कविजन परदेशीं.
जाशी का तू पडलीं पाहुनि तळ्तें दोन रितीं
चिरतनाच्या निर्झरिणीवरि पैलाडापरती !
*शाश्वततेचें भरुनि पाणी आणावा कळश*
कुणा भाग्यवंताचें तेणें न्हाणावें शीर्ष,
अम्लान प्रतिभेचीं अद्वय लेणीं लेववुनी
स्वानंदाचें लगत्रग उतरुनि लिंबलोण वरुनी,
दोन्ही सिंहासनीं तया एकातें बसवावें
प्रयाण करिती झालिस का तूं देवी या भावें ?
कविजनसंस्तुत काव्यदेवि ये परतुनि लवलाही
मुग्धमधुर वसुधा ग ! सारखी वाट तुझी पाही !

* * *

आधुनिकाचे कविते बाई ! अझुनी तुजवरचा
रोष न सरतां होई कांहीं विद्वद्वर्यांचा.
नूतन चालीरीती नूतन भूषावेषांना
भावाविष्करणाच्या नूतन घेशी धाटींना.
बाळपणें तूं उयळ जराशी, अछड वृत्तींची,
सौंदर्याचीं अस्फुट अंगें कोन्या रंगाचीं,
लाजेच्या साजेचा नाहीं मुखमंडळिं मेळ
अवगत नाहीं अझुनि चोरटा नेत्रांचा खेळ,
नटचंचल वावरा झडे फुल्लछंदांचा न नाच
जाणपणाची अझुनि लागली नच मंदहि आंच,
कोमल कलिकेमधली अस्फुट मधुसौरभसृष्टी
बादलछायेआदिल किंवा चंद्राची दृष्टी,
अथवा, दृष्टीपुढची अस्थिरसृष्टी बाळाची
लाट जणों तूं स्वर्भूःसरितासंगमलीलेची.
प्रौढ कलाढ्यत्वाचें वारें अंगिं न जरि वाजे
मुग्धदशेची चंचलता तुज कुळजेतें साजे.
कारकसंधीरूपें व्याकरणातिल सूक्ष्मतर
रसरीत्यादिक साहित्यांतिल दगडांचा चूर,
मूक्ष कशी या नियमें व्हावी तव माधुर्याची,
अगाध लावण्याची, निस्तुळ रूपारीतीची !
ह्रस्वदीर्घरेघोटीमात्राशास्त्रीं जों घेती
जुनीं मापकोष्टकें जराग्रीं बाजुस सारा तीं.

होता केव्हां, कांहीं, किंचित्, संप्रदायभंग
रंगाचा बेरंग काय हा अथवा वेढंग ?

कवितेच्या साम्राज्यामधलीं ही का वडाळी
तेणें होतें कांहो त्याचा राखरांगोळी ?

शुद्ध मराठी धाटी साधी कोणा अथवा न
गीर्वाणप्रचुरा रचना ती केव्हांही हीन.

शब्दरूपसंपदा ' रांगडी ' बाल्यामीं म्हणुनी,
' रांगड ' अथवा ' नागर ' हें तरि ठरावें कोणीं ?

संस्कृतभाषानियमाची का तुजवरि बळजोरी
स्वतंत्र अस्तित्व न तुजला कीं झाली वाट पुरी ?

नागर कुळ तव, नागर लोकीं सारा व्यवहार,
नागर वाङ्मयदेशीं सतत करिशी संचार

इथुन आणखी तिथुन आणिशी रत्नांचे हार
समृद्ध आम्हाकरितां करिशी भाषाभांडार

बिंदु बिंदु रक्ताचा, कण कण देहाचा, उमले,
विन्यास सौंदर्याचा न्हासानासाविण चाले !

अथांग अव्यक्तातुनि होशी निजलीला व्यक्त
तुझें तूंच निर्मिशी प्रसाधनशासन अभियुक्त

मृगजळ पाणी भरुनि राजणीं पडिका फुलू दे
सौंदर्याच्या कुजीं आम्हा रुजीं घालू दे

कविजनसंस्तुत काव्यदेवि ये परतुनि लवलाही
मुग्धमधुर वसुधा ग ! सारखा वाट तुझी पाही

ॐ ॐ ॐ

काव्य नव्हे शब्दाचा सुदर नादमधुर मेळ
अर्थचमत्कृतिचाही नोहे डोंवारी खेळ.
निसर्गसृष्टीचीं सादृश्यें, नातिपाठ भव्य,
थाटदार घाटाची रचना केवळ नच काव्य.
ऐश्वर्यात्मक सामर्थ्याची निर्माणक्षमता
अतरग ओथवुन ओसडे ती ' सुदरता. '
केवळ सौंदर्याचीं स्फुरणें प्रस्फुरणें दिव्य
जिव्हार हेंच स्वानंदाचें.—' सौंदर्यचि ' काव्य.
या सौंदर्यस्फुरणा म्हणती ' चैतन्य-स्फूर्ती–
प्रसाद–भगवताचें देणें–नैसर्गिक शक्ती '.
देवि शारदा हीच. न हें स्थल अभ्यासा साध्य
लोकोत्तर काव्याचें हेंचि प्रसवस्थल आद्य.
यास्तव कविजन अहभाव सोडोनी सपूर्ण
प्रसादसिद्धीसाठीं पहिलें करिती तुज नमन.
देवि ! जगीं तू, तसे तुझे ते भक्तहि, मज पूज्य
वंदन माझें गतांस, त्यांसहि असती जे आज.

● ● ●

## ३

# प्रणयपत्रिका

प्रणति मम सख्याच्या पूज्य पादद्वयासी,
विजय सतत चिंती आपुली दीन दासी.
*कितिक दिवस झाले ! आपलें पत्र नाहीं*
म्हणुनि बहुत चिंताग्रस्तचित्ता असे ही

सकल कुशल आहों श्रीहरीच्या दयेनें,
किमपिहि न करावी काळजी मत्प्रियानें.
*परि मम मन आहे खिन्न अत्यंत आई !*
कुशल कळविणारें पत्र तें कां न येई ?

किति तरि दिन झाले ! भेट नाहीं पदांची,
करमत मज नाहीं; वेळ वाटे युगाची.
सुखकर सखया ती आपली रम्य मूर्ती
निशिदिनिं दिसताहे पूर्ण सांठूनि चित्तीं

*क्षणभर अपुल्या मी दृष्टिच्या आड होतां*
करमत नव्हतें ना आपल्या थोर चित्ता ?
विविध मिष करावें काम कांहीं करीतां
मजविण मग कैसा कंठितां काळ आतां ?

दिनभरि सरकारी काम सारूनि येतां
लगबग गृहभागीं भागले, सांज होतां

कवण तरि प्रतीक्षा सेर्प्य दारीं करील
श्रम मधुर विनोदें कोण सारा हरील ?

मदितर असतांना जेवतां वाढप्याला
खचित, खचित गेला घास ना आपणांला !
निरलस दिनरात्रीं आपणांला जपाया
नच जवळ कुणीही काळजी योग्य घ्याया.

रजनिसमय येतां झोंप घ्यावीत भारी
परि कर नसतांना आपुल्या त्या शरीरीं
दचकुनि किति वेळां नित्य तुम्हीं उठावें
गति कशि अपुली हो संप्रती, हें न ठावें.

प्रकृति कितितरी ती सन्य नाजूक आहे
विरह मम तुम्हांला, जाणलें मी, न साहे
सुतनु अमित बाई ! क्षीण झाली असेल
मजसम अपणांला घ्यास माझा असेल.

तरल मन नराचें राहतें ऐकतें मी
विसर वधुनि पावे अन्य पात्रास नामी.
कमलिनि भ्रमराला नित्य कोशांत ठेवी
अविरत म्हणुनी तो पकजीं प्रेम दावी.

विसर पडुनि गेला काय माझाहि नाथा ?
म्हणुनिच धरिलें हें वाटतें मौन आतां
सदय, पण, सख्याच्या मानसा पूर्ण जाणें
तिळभर असली ही कल्पना व्यर्थ घेणें !

मम विरह तुम्हांला जागरीं क्षीण देई
स्थिति जरि असली का आपुली सत्य होई
तरि मग मज आहे इष्ट ही गोष्ट साच
सतत छळ सख्याचा हो मदर्थी असाच

जपुनि सतत वागा. काळजी सर्व सोडा.
प्रणय मजवरीचा आपुला हो न थोडा.
लिहुनि सकळ धाडा वृत्त सोडूनि काम.
बहुत नच लिहीणें, हा मदीय प्रणाम.

• • •

४

## वेडगाणें

*टला–ट रीला–री*
जन म्हणे काव्य करणारी.

आकाशाचीं घरें
त्याला प्रकाशाचीं दारें
ग्रहमाळाच्या वर अडसरी ग,
जन म्हणे काव्य करणारी.

पाचूच्या वेली
न्हाल्या लावण्याच्या जलीं
दारीं उभ्या स्वर्गीय नरनारी–ग,
जन म्हणे काव्य करणारी.

उडुगणाच्या यानी
वसुन विश्वाची राणी
अनंताची प्रदक्षणा करी–ग,
जन म्हणे काव्य करणारी.

चंद्राचें हसणें
वायूचें वरळणें
सृष्टिसुरांत सुर मी भरी–ग,
जन म्हणे काव्य करणारी.

मी न तुझी–त्याची
मी न माझी–युगाची !
ब्रह्मांडाच्या घडामोडी करी–ग,
जन म्हणे काव्य करणारी.

दिव्य भोगांच्या खाणी
गाय मनोमय वाणी
कशी वदेल राठ वैखरी–ग,
जन म्हणे काव्य करणारी.

टला–ट रीला–री
जन म्हणे काव्य करणारी.

• • •

## ५

# प्रमिला

राहे संकनिकल्पनेंत, सवितातेजात, जी दिव्यता
जीच्या ती नयनीं वमूनि नितरीं मांगल्यसंपन्नता
ती निद्रावश होय आज रमणी एकान्त शय्येवर
वाटे कीं निजलें निरभ्र गगनीं नक्षत्र हें सुंदर!

येतां दृष्टिपथात मी, मिटुनि जें संकोच पावे अतां,
तें निद्रेत मुखारविंद फुललें मंदस्मितानें किती!
स्वच्छंदें प्रतिकारिता मजप्रति, प्रोत्साह ये ज्या नव,
हाले हात मृणालनालसम, तो माझा करी गौरव!

त्या केलास विरोध आजवर जो माझा सखे–साजणी!
त्याचा हा अनुताप काय दिसतो झाला असे त्वन्मनीं?
हे ओष्ठ स्फुरतात, आतुर जणों माझ्यासवें भाषणीं,
निद्रा ही उपकारिणी प्रगटली, घाली हिला मोहनी!

माझी मूर्ति असेल सांप्रत हिच्या हृन्मंदिरीं स्थापिली,
न्हाणोनि प्रणयें, सुनर्म सुमनें अर्पूनि आराधिली,
झालें सस्मित आस्य, नेत्र उघडे ईषत्, कपोलीं कर,
रामा मंगलदेवता रमतसे निर्वैर शय्येवर

वाहे तो सरिदोघ, जोंवरि असे तो भूवरी भूधर,
नक्षत्रासह चंद्रसूर्य असती व्योमांत कीं जोंवर,
राहो तोंवर ही अशीम विनमा निद्रिस्त रामा स्थिर,
मी राहीन असाच पाहत उभा हें चित्र लोकोत्तर!

• • •

६

# पिंगा

माझा पिंगा गोड गडे
अद्वयरंगीं रंग चढे.

नाचण मी मुळची मोठी,
उद्भवल्या माझ्या पोटीं
कोमळ नवनीतापरिस,
ज्योत्स्नेहुनि कान्ती सरस,
दिक्‌रागांहुनि दिव्यतर,
चंचळ चपलेच्याहि पर
वृत्ति गोरट्या अकलंकी–
माय तशा झाल्या लेकी !

* * *

प्रसन्न हृदयाच्या कोशीं
असती सौरभरसराशी
त्यांस लुटाया पोटभरी
वृत्ती झाल्या हो भ्रमरी !

गोंगाटाला थावविलें,
श्रवणमनाला कळुं न दिलें
कौशल्याची नवलाई
रस चोरुनि प्याल्या बाई !

तो प्रमदाचा संभार
येउनि आला अनिवार,
वळेंचि माझा धरनि कर
मज केलें वृत्ताकार.

धुंद नशा भरली नेत्रीं,
जीवन मुसमुसलें गात्रीं.
गुरुलघुतेची कृत्रिम ती
पार उठाली मम भ्रांती.

मिळून आम्ही सर्वजणी
नाच मांडिला एकपणीं.
अनेक नेत्राचें बघणें,
अनेक कंठाचें गाणें

अनेक चरणाचें जाणें,
अनेक चित्ताचें स्फुरणें,
दृष्टी, वाणी गती, मती
एकच येथुन तेथुन ती.

प्रवाह बहुमुख जो होता
वाहे एकमुखें आता,
वृत्तींचें वळ मज मिळता
विश्व सहज आलें गिळता.

* * *

पिंगा माझा सोन्याचा
पंजर रत्नाचा त्याचा,
पहा ! उघडिलें दाराला,
पिंगा आकाशीं गेला !

पिंगा माझा अलौकिक
शोधुनि आला भूलोक.
चारी खाणी मी वाणी
सांगितलें त्यानें कानीं !

पिंगा गेला स्वर्गाला.
भूवरि घेउनि त्या आला.
अंग्रितलीं दडपुनि त्याला
नाच वरी म्यां मांडियला !

दानव मानव सुरासुर
मी, मजविण ते नि:सार !
मी येता उदयोन्मुख तें
जग तेव्हाची संभवतें !

दुर्बलपण पहिलें गेलें,
क्षुद्रपणांतुन मी सुटलें,
जीर्णबंध सारे तुटले,
मी माझी मज सापडलें !

स्वार्थजनित सद्गुणभास
जडले होते अंगास
ते गुण झाले मम धर्म
प्रेमास्तव आतां प्रेम !

तारा सारंगीवरल्या
सम सूरीं लागुन गेल्या;
भूतें आलीं साम्याला
मोहर आनंदा आला !

विश्वबंधुता एकांगी
न पुरे माझ्या पासंगीं,
भूतें मी—मजला नातें—
द्वैत कसें हें संभवतें ?

मज कसलें जाणें येणें !
भाव-अभावाविण असणें-
बुद्बुद हो कीं कल्लोळ
अर्णवपद माझें अढळ !

* * *

*काय करूं—पण कसें करूं !*
मीपण माझें का विसरूं ?
' दीपकळी गे ! दीपाला
सोड—' म्हणे कां बुध तिजला ?

म्लानपणाविण लावण्य,
क्षीणपणाविण तारुण्य,
मंगळमांगल्यायतन,
नित्यानंद निरावरण,
विश्ववैभवालंकरण,
तें माझें तें—स्वयंपण !

※ ※ ※

पिंगा आला भर रंगा,
आत्मभाव भिडला अंगा.
नाच परी मम राहीना,
स्वभाव मुळचा जाईना !

नाचा माझ्या वृत्तींनो !
नाचा भुवनसमूहांनो !
नाच आपला भूताला
होवो शान्तिप्रद सकला !

• • •

७

# प्रणयप्रयाण

When the lamp is shatter'd
The light in the dust lies dead.
—*P. B. Shelley*

भंगतां दीप तेजाची मृत्तिकेंत कलिका निमते.

देवेंद्रचापचारुश्री, विखरता मेघ, ओसरते.
विच्छिन्नततुवीणेची श्रुतिरम्यरवस्मृति नुरते
प्रस्फुट प्रीति नंतर ती, उद्गारमाधुरी सरते.
नष्टता दीप वीणा ती
सुप्रभा न सुस्वर उरती,
निर्मिती न अंत:स्फुरणें, संपता प्रणय, गीतांतें !

रागोर्मिरक्तचित्ताचें मग मधुर काव्य तें कुठलें ?
नैराश्यजन्य नादाचें चिर निलय हृदय तें बनलें.
उध्वस्तसदनशालेच्या रंध्रात वायु जणु बोले !
सागरीं निमाले कोणी,
त्यावरी घोर घोषानीं
जणु आक्रंदन वीचींनीं मांडिलें विकलचित्तें तें

हृदयाचें मेळन होता पांखरूं नच प्रीतीचें
त्यागितें प्रथम त्यामधलें कोटर प्रनलयधाचें;
अवलंतीरें यसतें घाले सोसाया पूर्वस्मृतिचे

वा प्रणया! भंगुर सगळें
वस्तुजात म्हणसी इथलें,
कां क्षीण सदन मग रुचलें स्थोद्भवस्थितिप्रलयातें?

तुज विकार आतां हृदया! आंदोलन देतिल खासें,
शैलाग्रकोटरीं गृध्रा हाल्वी प्रभंजन जैसे.
तुज हसेल तीव्र प्रज्ञा अभ्रांत जसा रवि हासे
तव तुंग नीड तें कुजता,
कोसळूनि आश्रय नुरता,
हिम पडतां, पल्लव झडतां, उपहासित होशिल पुरतें!

• • •

## ८

## माझी कन्या

[ शाळेंतील एका मुलीला कोणीं भिकारीण म्हटल्यावरून घरीं येऊन ती स्फुदूनस्फुंदून रडत आहे आणि बाप तिची समजूत करीत आहे, असा प्रसंग कल्पिला आहे. विषादाच्या तळावर बापाचा विनोद मुख्यत वर्णन करण्याचा या कवितेंत यत्न केला आहे. ]

गाइ पाण्यावर काय म्हणुनि आल्या?
का ग गंगायमुनाहि या मिळाल्या?
उभय पितरांच्या चित्तचोरटीला
कोण माझ्या बोलले गोरटीला?

उष्ण वारे वाहती नासिकांत *
गुलाबांला सुकविती काश्मिरांत,
नंदनांतिल हलविती वल्लरीला,
कोण माझ्या बोललें छबेलीला ?

शुभ्र नक्षत्रें चंद्र चांदण्यांची
दूड रचलेली चिमुकली मण्यांची
गडे ! भूईवर पडे गडवडून,
कां ग आला उत्पात हा घडून ?

विमा-विमला आपटे-प्रधानांच्या
अन्य कन्या श्रीमान कुलीनांच्या
गौर चैत्रींची तशा सजुनि येती,
रेशमाचीं पोलकीं छिटें लेती.

तुला ' लंकेच्या पार्वती ' समान
पाहुनीया, होवोनि साभिमान
काय त्यांतिल बोलली एक कोण
अहा ! आली ही पहा, भिकारीण ! '

मुली असती शाळेंतल्या चटोर;
एकमेकींला बोलती कठोर;
काय बाई ! चित्तांत धरायाचे
शहाण्यानें ते शब्द वेडप्यांचे !

---

* नासिकेंत्यग. हें गांवाचें रूपक आहे. नासांतून निघणाऱ्या उष्ण श्वासांच्या प्रभावाच्या अत्युक्तीची फोड करण्याची काहीं जरूर दिसत नाहीं. या व पुढील दिंडीत, हात, पाय, तोंड, डोळे, इत्यादि अवयव सूचित आहेत.

रत्न सोनें मातींत जन्म घेतें,
राजराजेश्वर निज शिरीं धरी तें;
कमळ होतें पंकात, तरी येतें
वसतश्री सत्कार करायातें.

पंकसंपर्कें कमळ का भिकारी ?
धूळिसंसर्गें रत्न कां भिकारी ?
सूत्रसंगें सुमहार कां भिकारी ?
कशी तूंही मग मजमुळें भिकारी ?

बालसरिताविधुवल्लरींसमान
नशीबाची चढतीच तव कमान;
नारिरत्नें नरवीर असामान्य
याच येती उदयास मुळावून.

भेट गगायमुनास होय जेथें,
सरस्वतिही असणार सहज तेथें; *
रूपसद्‌गुणसंगमीं तुझ्या तैसें,
भाग्य निश्चित असणार तें अपेसें.

नेत्रगोलांतुन बालकिरण येती,
नाच तेजाचा तव मुखीं करीती;
पाच माणिक आणखी हिरा मोतीं
गडे ! नेत्रा तव लव न तुळीं येतीं.

---

* त्रिवेणीसंगमात सरस्वती नदी दिसत नाहीं; ती गुप्त आहे, अशी लोकप्रसिद्धि आहे.

लाट उसळोनी जळीं खळें व्हावें,
त्यांत चंद्राचें चांदणें पडावें,
तसें गालीं हासतां तुझ्या व्हावें,
उचंबळुनी लावण्य वर वहावें !

गौरकृष्णादिक वर्ण आणि त्यांच्या
छटा पातळ कोंवळ्या सम वयाच्या
सर्व घेउनि तनुरंगं अद्भुताचा
खेळ चाले लघु रंगदेवतेचा !

काय येथें भूषणें भूषवावें,
विविध वसनें वा अधिक शोभवावें ?
दानसीमा हो जेथ निसर्गाची,
काय महती त्या स्थळीं कृत्रिमाची !

खरें सारें ! पण मूळ महामाया
आदिपुरुषाची कामरूप जाया
पहा नवलाई तिच्या आवडीची,
सृष्टिशृंगारें नित्य नटायाची

त्याच हौसेनुन जगद्रूप लेणें
प्राप्त झालें जीवास थोर पुण्यें,
विश्वभूषण सौंदर्यलालसा ही
असे मूळातचि, आज नवा नाहीं !

नारि मायेचें रूप हें प्रसिद्ध,
सोस लेण्याचा त्यास जन्मसिद्ध,
तोच बीजांकुर धरी तुझा हेतू,
विलासाची होशील मोगरी तू !

तप सिद्धीचा 'समय' तपस्व्याचा,
'भोग' भाग्याचा कुणा सभाग्याचा;
पुण्यवंताचा 'स्वर्ग' कीं, कुणाचा,
'मुकुट' कीर्तीचा कुण्या गुणिजनाचा.

'यशश्री' वा ही कुणा महात्म्याची,
'धार' कोण्या रणधीर कट्यारीची;
दिवसमासें घडवीतसे विधाता
तुला पाहुन वाटतें असें चित्ता!

तुला घेइन पोलकें मखमलीचें,
कुडीं मोत्यांचीं, फूल सुवर्णाचें,
हौस वाई! पुरवीन तुझी सारी,
परी आंतरिं हा प्रलय महाभारी!

दर्गे वल्कट झाकोनि चंद्रिकेला,
तिच्या केलें उद्विग्न चांदण्याला,
हास्यलहरींनीं फोडुनी कपाट
प्रकाशाचे वाहवीं शुद्ध पाट!

प्राण ज्याच्यावर गुंतले सदाचे,
कोड किंचित् पुरविता न ये त्याचें;
तदा बापाचें हृदय कसें होतें,
न ये वदतां, अनुभवी जाणती तें!

माज धनिकाचा पडे फिका साचा,
असा माझा अभिमान गरीबाचा
प्राप्त होतां परि हे असे प्रसंग
हृदय होतें हदरोनिया दुभंग!

देव देतो सद्गुणी बालकांना
काय म्हणुनी आम्हांस करंट्यांना ?
लांब त्याच्या गांवास जाउनीया
गूढ घेतों हें त्यास पुसोनीया !

"गांवि जातों," ऐकतां त्याच काळीं
पार बदलुनि ती बालसृष्टि गेली !
गळां घालुनि करपाश रेशमाचा
वदे "येतें मी" पोर अश्रवाचा !

• • •

९

## दीपज्योतीस—

सोन्याची तनु जाळितेस अपुली पाषाणमूर्तीपुढें,
मुग्धे ! तें वद कोण पुण्य तुजिया हातास तेणें चढे ?
सारें विश्व बुडे तमांत तिकडे भोंवावुनी बापुडें,
गे ! निष्कंप, तुला परंतु इकडे, ही ध्यानमुद्रा जडे.

घ्याया कोंडुनि मंदिरांत जगदुघानीं न तूं जन्मली,
वाया नासुनि जावया तुजवली बागेंत चांफेकळी !
व्हाव्या वर्धित वस्तु ज्यांत वसतें सौंदर्य अत्युत्कट,
इच्छा केवळ की ! न वस्तुसह तें पावो जगीं शेवट.

प्रत्यंगीं अवघ्या प्रकर्षभर ये ज्यांच्या पुरा मोडुन
त्यांच्या पूर्णपणास सुस्थिरपणा येथें न अर्धक्षण;

पूर्णोत्थापनकाल तोच पतनप्रारंभही होतसे,
ऐसा निष्ठुर कायदा सकल या सृष्टींत शासीतसे !

येथें नूतनजीर्ण, रूप अथवा विद्रूप, नीचोत्तम,
न्यायान्याय, अनीतिनीति, विषयीं संभोग का संयम;
जातीं हीं भरडोनि एक घरटीं, एकत्र आक्रंदत,
आशा भीतिवशा म्हणूनिच मृषा स्वर्ग स्त्रजी शाश्वत.

*हें वैषम्य असह्य ' होतसमयीं ' स्थापावया साम्यता,*
तेजोवंत यदा यदा त्यजुनि ती प्रेतोपमा स्तब्धता;
अन्यायप्रतिकारकार्य करिती नाना प्रकारान्तरें,
*दारीं बंड ! घरांत बंड ! अवघें ब्रह्मांड बंडें भरें !*

*हें लोकोत्तर रूप तेज तुजला आहे निसर्गें दिलें,*
कीं तूं अन्य तशीच निर्मुनि जगा द्यावीस कांहीं फलें;
दानें दे न कुणा निसर्ग ! धन तो व्याजें तुम्हां देतसे,
*तें त्याचें ॠण टाक फेडुनि गडे ! राजीखुशीनें कसें !*

*होतां वेळ रसप्रसन्न फुटुनी येतो फुलोरा तिला,*
ती आत्मप्रतिमांस निर्मुनि हसे संहारकालानला;
' वाढा आणि जगा ' निसर्ग म्हणतो सृष्टीस भूतात्मिका,
*डोळ्यांनीं उघड्या पहात असतां होशी गुन्हेगार का ?*

• • •

## १०

# वात्सल्य

पूर्वेला स्पर्शुनि शशि अस्तगत झाला,
उदरस्थ बिंब तदनंतर ये उदयाला.

पाहता पुत्रमुख अश्रु तिचे ओघळले,
हिम होउनि होते ते सृष्टीवर पडले

व्योमस्थ दृश्यसाम्य तें तदा महिवरलें
पाहिलें, नष्ट शैशवस्मरण टवटवलें.

निष्कलंक मुख, विस्तीर्ण भाळ तेजाळ,
तनुवर्ण धवळ, करुणालय नयन रसाळ.

ती मातृदेवता उच समोर करात
शिशु धरुनि होती तन्मुखदृक्सुख पीत
या निखळ सुखाचा सहकारी प्रेमाचा
तो होता तिजला अंतरला जन्माचा.

दामिनीदामसम दारुणतर तें स्मरण
हृदरवी स्फुरुनिया तदीय अंतःकरण

हृदयाच्या दिसञा खोल कपारीआत
शून्याचा अधुक देश अपार अनंत,

दुःखाचा अन्तःप्रवाह वाहत होता,
ओलावा त्याचा स्फोट मुखीं हो करिता.

पूर्णस्थ विंदु मृदु गधवाह हलवोनी
दों विंदूचे करि एकजीव मिळवोनी,

या विश्वकर्दवीं तेविं मातृविंदूतें
शिशुविंदु मिळे जगदवदयामृतवातें

ॐ ॐ ॐ

आरक्तरेणुरविहास्य उधळलें तिकडे,
तें उदित वाळसुमहास्यपरागहि इकडे.

तें वालभानुपदलास्य नभावर चाले,
ते मातृहृदावर चचळ शिशुपदचाळे

पाहता प्रभातीं बालजगा वर खालीं
तृष्णस्मृति सपुनि मातृमुखीं ये लाली,

सद्‍गदित हृदय तद्‍गात्रासह थरथरलें,
नेत्रातुनि अविरत वात्सल्याश्रु गळाले,

वात्सल्य दिसे तें बहुविध विश्वविकासी,
तें विश्वात्म्याचें विमल हास्य अविनाशी,

तें स्वार्थसमर्पण धन्य परार्थासाठीं
प्रत्यक्ष निर्मिलें स्वर्ग धरेच्या पाठीं

• • •

११

## चांफा

चाफा बोलेना, चाफा चालेना,
चाफा खंत करी काहीं केल्या फुलेना ॥ध्रु०॥

गेलें 'आम्राच्या' वनीं
म्हटलीं मैनासवें गाणीं
आम्हा गळ्यात गळे मिळवून.

गेलें केतकीच्या वनीं
गंध दर्वळला वनीं
नागासवें गळालें देहभान.

आलें माळ सारा हिंडुन
हुबर पर्वतनें घालुन
कोलाहलानें गलबले रान

कडा धिप्पाड वेढी
घाटी उड्यावर उडी
नदी गर्जुन करी विहरण

मेघ धरू धावे
वीज चटकुन उठे
गडगडाट करी दारुण

लागुन कळिकेच्या अंगा
वायु घाली धांगडधिंगा
विसरुनी जगाचें जगपण.

सृष्टि सांगे खुणा
आम्हा मुखस्तंभ राणा
मुळीं आवडेना ! रे आवडेना ! !

चल ये रे ये रे गड्या !
नाचुं उडुं घालुं फुगड्या
खेळुं झिम्मा झिम्-पोरी झिम्-पोरी झिम् !

हें विश्वाचें अंगण
आम्हा दिलें आहे आंदण
उणें करूं आपण दोघेजण

जन विषयाचे किडे
यांचीं धाव बाह्याकडे
आपण करूं शुद्ध रसपान

' दिठीं दीठ जाता मिळुन
गात्रें गेलीं पागळुन
अंगीं रोमांच आले थरथरून

चाफा फुलीं आला फुलुन
तेजीं दिशा गेल्या आटुन
कोण मी—चाफा ? कोठें दोघे जण ?

• • •

१२

# निवेदन

रम्य सायेसम वालपल्लवानीं
मधुस्पर्दी मार्दमनरींनीं
गुंफिलेल्या एकान्त निकुंजात
कूजनप्रिय रमतात खगव्रात!

मद विचरे मधुमत्त गधनात,
शान्ति विश्रमली ज्या स्थलीं नितान्त,
चाल कुंजीं त्या, गूढ इंगिताला
कथिन तुज मी अव्यग्र शुभांगीला.

दिशा उत्कंठित अबर प्रसन्न,
उदय पावे शशिबिंब रसाळ्किन,
रूप पाहुनि हें सृष्टिसुंदरीचें
स्तब्ध झालें चांचल्य निसर्गाचें

दिव्यगगातीरस्थ वल्लराला
मुकुल आलें त्या एक निर्मलेला,
वाहुनी तें मद्भाग्यगंधवाहें
दिलें येथें आणून वाटताहे

अपार्थिव जे सगूढ भाव चित्तीं
व्यक्त सहजें मात्र करू येती,
स्पष्ट करितां ते वळें, सर्व जातें—
कान्ति, मार्दव, सारस्य त्यातलें त!

ओढ तत्रापि स्तब्ध बसूं दे ना,
समुत्सुक मन संकल्प करी नाना,
भ्रमति एक्या विषयींच ते क्रमानें
रत्नसानु-ग्रहमालिकांप्रमाणें !

होय खळबळ जी अंतरीं मदीय,
भ्रमणवेगाची तीव्रता तदीय
स्पंद हृदयाचे स्तब्ध निकुंजांत,
कांहिंवाही करितील तुला ज्ञात !

कुंज आधीं सम्मोहनीय भारी,
वरी रमणीसहवास मनोहारी !
भ्रान्त होउनि वरळेन जरी कांहीं
दोष माझा तिळमात्र त्यांत नाहीं !

नभीं दोषाकर हा पहा उदेला,
भ्रंश मनुजाच्या पाडितो मनाला;
गोड इंदूचा आणि पिसाटाचा
सिद्ध आहे संबंध अनादीचा !

० ० ०

# १३

# आशादेवी

[सुधारलेल्या जगातील चालू (१९१४ चें महायुद्ध) भयंकर रणकंदनामुळें मानवी सुधारणेसंबंधीं नाना शंका उद्भवतात. काळाच्या अनंत प्रदेशांत हल्लीं मानवता अशा एका ठिकाणीं प्राप्त झाली आहे कीं तेथें सर्वत्र 'धुंधुकार' पसरला आहे! तरीदेखील आशादेवी भूगोलावर बसून आपल्या भग्न वीणेंतून मधुर स्वरालाप काढीत काढीत भावी कालाचीं उज्ज्वल स्वप्नें पाहात बसली आहे. या भावी घटनेंत आपण कोणता भाग घेणार?]

झाली पश्चिम लाल लाल सगळी रक्तामधें माखुन,
गेली मातुन मानदर्पमदिरा वेहद ती प्राशुन;
प्रेतांनीं भरलें नभातिल दरें खोरें तयाच्यावर
मांसाच्या चिखलांत मुक्त फिरते ही भैरवी भेसुर.

होती पूर्व!–उषासखी, गुणवती, सत्त्वाढ्य, तेजोवती,
जीचें नित्य मृदुत्व लज्जित करी जाईजुईशेवती,
ती हा प्राणिविनाश घोर बघुनी उद्विग्न झाली पुरी
शिंतोडे पडले अशुद्ध उडुनी तन्मंगलश्रीवरी.

रक्तें रंजित भोग काय करणें प्रीत्यर्थ त्याच्या रणें?
येथें सात्त्विक संपदा न मिळती का रक्तपाताविणें?
आहे मानवजाति आक्रमित का उत्क्रान्तिपंथाप्रती?
शंका त्रासविता अशा, दिसुनि ये सौं एक चित्राकृति.

" होतें सर्व समोंवतीं पसरलें संदिग्ध श्यामाम्बर,
काळ्याशार दगांत थेट शिरतां भूगोल हो गोचर;
तारा लोपुनि सर्व एक सरसा अंधार हो वाटता
तेथें पश्चिम पूर्व कोण कुठल्या ? साऱ्या दिशा आटता.

विश्वांतील समस्त वस्तुंमधलें सौंदर्य जें जें असे,
नेत्रींच्या पुतळीकडून जपुनी वेचूनि घ्या तें कसें !
चित्ताची बनवून मूस, तुमच्या सत्कल्पनेच्या करें
ओता मूर्ति तुम्हीच, कारण गिरा लाजोनि येथें सरें !

भूगोलावर त्या अधिष्ठित अशी कोणी कुमारी असे,
रूपा आंत नव्या छटा उफळता 'न्यारी' खुमारी दिसे !
[अंगांगें मळलेलें, लडींत मळलेलें केसें मुखाशीं, किती,]
स्कंधींचा सरला जरी पदर तो नाहीं तिला शुद्ध ती.

आकांक्षा, असहायता, अवघता, चर्येवरी रेखले
होते भाव, तयास पाहुनि झणीं पाणी मुखींचें पळे;
स्नेहस्निग्ध नसे तिची नजर, ती शून्याकडे लागली,
वाटे स्वप्नदर्शेत चूर सगळी वृत्ती तिची जाहली !

वीणा एक जवाहिरें जडविली होती, जियेच्या वरी
तारा सर्व तुटोनि एक उरली बाकी, तियेला जरी
होती छेडित ती तशीच बसली काढीत तारेंतुनी
नाना सुस्वर मालिका, मृत मना चैतन्य दे तो ध्वनी !

हें चेतोहर चारुचित्र विरलें त्या चारुगात्रीसह,
झाला जीव विषादजन्य हृदयग्लानीमुळें दुस्सह;
आहे सर्वविनाश 'आ' करुनिया आता समीपस्थितं,
यत्नाच्या परमावधीविण टळेना, तो असे निश्चित.

होतें कार्य न हो, तरीहि पडल्या काळांत या कष्टद
गाणें पूर्वपरंपरादि महती हें शुद्ध हास्यास्पद;
तेणें काय फसेल धूर्त जग हें वाटे असें आपणां ?
हें तों केवळ आत्मवंचन ! पुरें आतां शुन्या वल्गना !

विज्ञानें निगमागमांत असती किंवा पुराणांतळीं,
तीं तेथेंचि असोनि द्या ! गरज ना त्यांची कुणा राहिली
शान्तिप्रेम समत्व पाठ नसते गाऊंचि द्या आजला,
जे का मोहनमंत्रबद्ध असती माझे कवी त्यांजला.

आहे हा व्यवहाररूप अखिल व्यापार जो जो दिसे,
हें आहे जर मान्य, कायम ठसे त्याचे घडावे कसे ?
निर्मावें जग अन्यथा, त्यजुनिया वस्तुस्थितीला सदा
राष्ट्रात्मा अति पंगु पोकळ बने तेणें; नसे फायदा.

आहे बाल्यदशा दिसंदिस जरी वाढीस हा लागला
चालू मानववंश, हें न समजा कीं पूर्णता पावला,
हा तो नित्य चुके, प्रसंग पडती बाके, सदा काळजी !
खात्रीचा न उपाय एक म्हणुनी योजूं नये काय जी ?

आर्यांचेंच नसानसांत उसळे तें रक्त जें दुर्धर,
ना बाहेर न आंत खास जगतीं आम्हांस जें दुष्कर;
देऊं तोंड नवीन काळ जर हा होऊन आम्ही नवे,
येतें पालटतां अम्हांसहि पुढें आल्या स्थितीच्या सवें.

आहे जोंवरि एक तंतु उरला वीणेवरी शाबुत,
आशा अद्भुत रम्य बोल असले राहील तो काढित;
ती होऊनि निराश, उज्ज्वल तिचीं स्वप्नें लया पावतीं
रक्षो एक तदा दया भगवती आम्हां प्रभूचीच ती !

• • •

१४

# मनोहारिणी

[ लॉर्ड बायरनची मिसेस् विल्मॉट नावाची एक बहीण होती. असंख्य टिकल्यांचा कृष्णवेष परिधान करून ती बॉलकरितां नटून आली होती त्या प्रसंगाला अनुलक्षून बायरननें " She walks in beauty " ही कविता रचलेली आहे. तिचें भाषांतर करण्याचा प्रयत्न खालील कवितेंत केला आहे. ]

पदन्यास लावण्यप्रान्तीं ही करिते रमणी;
तारामंडित निरभ्रांबरीं जशी रम्य रजनी !

शुभ्र कृष्ण वर्णांतिल सारी मोहकता आली—
नेत्रीं, गात्रीं, एके पात्रीं, हृदयंगम मेळीं.

सम्मीलित ती कान्ति दिसे अति शान्त सरस नयना,
शशिकररंजित रजनीसम, जी प्रखर दिना ये ना.

उषा किरण, कीं अधिक झाक, जर या रूपीं पडती
अनिर्वाच्य ती संगमशोभा अर्धी तरि जाती !

कृष्णकेशपाशावर येती श्याम श्याम लहरी,
शुभ्र तेज मुखसरसिरुहावरि सुरुचिर लास्य करी.

मृदुमंगल मधुभाव आननीं जे मुद्रित होती—
किती शुद्ध, किति रुचिर, * उगम निज ते प्रस्फुट करिती.

मृदुल कपोलीं हास्य मनोहर जें क्रीडा करितें,
भास्वत् भालीं शान्त तेज जें संतत लखलखतें.

* हृदय

मुखाचि त्याच्या वक्तृत्वानें हिजविषयीं पटते
साक्ष मनोमय पवित्र चारित्र्याची हृदयातें

निर्वैर भूतमात्राच्या ठायीं हिची चित्तवृत्ति
निर्व्याज प्रेमळभावाची ही रमणी मूर्ति.

• • •

## १५

## डंका

तेजाचे तारे तुटले मग मळेचि सगळे पिकले !

लागती दुहीच्या आगी राष्ट्राच्या ससाराला,
अति महापूर पुर येतो रोगयाच्या पावित्र्याला,
खडबडाट उडवी जेव्हा कोरड्या विधींचा मेळा,
चरकात मान्यवर पिळती
सामान्य मुकी जनता ती,
लटक्याला मोलें येती,
कौटिल्य स्वर बोकाळे ! तेजाचे तारे तुटले !

आचारविचारौघाचा नव नित्य रक्तसचार
ज्या समाजदेहीं होता अनिरुद्ध करित व्यापार,
त्या देहा ठायीं ठायीं धट कसले बध अपार
कोंडिलें स्वार्थकोंड्यात,
जल सडलें तें निभ्रान्त
तरि धूर्त त्यांस तार्थ व
देउनी नाचिती मोठे ! तेजाचे तारे तुटले !

कर्तव्य आणि श्रेयाची   ही दिशाभूल जेव्हां ती,
आंधळ्या त्याग उपजोनी डोहळे भिकेचे पडती;
अतिरेक पूज्यभावाचे   पुंकिती विवेकज्योति;
मग जुन्या आप्तवाक्यातें
भलतिशीच महती येते,
* राणीची दासी होते,
बुद्धीचे फुटती डोळे ! तेजाचे तारे तुटले !

घन तिमिरीं घोर * अघोरी विक्राळ मसण जागिवती;
ती 'परंपरा' आर्यांची 'संस्कृती,' 'शिष्टरूढी' ती;
'धर्मादि' प्रेत झाल्यांचीं बेफाम भुतें नाचविती;
ही दंगल जेव्हां होते,
नाकळेचि कोठुन कीं तें,
येतात वडवाले ते,
जग हाले 'स्वागत' बोले ! तेजाचे तारे तुटले !

या बड्या वडवाल्यांत   'ज्ञानेश्वर' मानें पहिला;
मोठ्याच्या सिद्धान्तांचा   घेतला पुरा पडताळा,
डांगोरा फोलकटाचा   पिटविला अलम् दुनियेला;
झुंजोनी देवां दैत्यां
+ 'अमृता' मधि न्हाणी जनता;
उजळिला मराठी माया;
सत्तेचे प्रत्यय आले ! तेजाचे तारे तुटले !

---

* बुद्धि * अघोरपथी + अमृतानुभव नावाचा ज्ञानेश्वराचा ग्रंथ.

हिंमतीनें अपुल्या प्रान्तीं उत्क्रान्ति शान्तिमय केली;
प्रेमाच्या पायावरती समतेचि इमारत रचली,
अंगची करामत ज्यांनीं 'खल्दिा' समर्पण केली;
ढाळिले अश्रु जे त्यांनीं,
सागरांबर-स्त्री-धरणी
निज उदरीं या चौघांनीं
आहेत जतन ते केले, तेजाचे तारे तुटले !

लागला वार अंगाला, रंगला यशानें त्याचे,
घासला साहणेवरती, ओकला लोळ आगीचे;
जाळिला तदा गंधानें, भेदिले रेणु वायूचे;
आम्ही त्या दिल्जानांचे
साथी—ना मेलेल्यांचे
हे डंके झडती त्यांचे,
ऐकोत कान असलेले ! तेजाचे तारे तुटले !

• • •

१६

## मार्गप्रतीक्षा

पुष्पांचे मृदु बाहुबंद पडले उन्मत्त भृंगावरी,
अत्युत्कंठित वल्लरींस धरिती वृक्ष स्वयुत्स्यंतरीं,
झाले निद्रित भानुबिंब—दयिता दिग्देविवक्षावरी,
येथें मी पण एकलीच बसुनी मार्गप्रतीक्षा करीं !

ओढी उत्कट सिंधु मुग्धवधुचाचैलाञ्चला झोंबुनी,
वाटे मंगल काल रंगमय ह्या जातां प्रसंगांतुनी,
विश्वीं या सहवाससौख्यसलिलस्नानाङ्ग सारें जरी
येथें एकच मी अशीच वसुनी मार्गप्रतीक्षा करीं !

• • •

## १७

## जादू

कोंडुनि नभभांडारीं पडली,
दिव्यतेज–विभवाभिनवाली;
फोडुनि नभ ती
मलीन जगतीं–
वर विखरुनि देईल अशी
जादू कोठें मिळेल कशी !

गाढ गूढभूगर्भी गढलीं
बहुविधरंगी रत्नें सगळीं
विदारुनी खनि
नीरस अवनी
ललामललिता करिल अशी
जादू कोठें मिळेल कशी !

उभ्या कड्याच्या कपारिंत
कठीण कोंसे दडलेत;
त्यांस छेदुनी
पटास निर्मुनि
उघडे जन झाकील अशी
जादू कोठें मिळेल कशी !

हृदयाच्या कातळातळीं
अक्षय जीवन घे उसळी;
पाषाणांसी
भेदुनि प्यासी
जनता ताजी करिल अशी
जादू कोठें मिळेल कशी !

चिवट रूढिच्या कचाटिंत
धूरिण पडले कुचंबत;
चिरडुनि तिजला
यशोध्वजेला
दिगंतरीं रोवील अशी
जादू कोठें मिळेल कशी !

• • •

# १८

## तीव्र जाणीव

"आम्हीं आद्यजगास चालन दिलें अध्यात्मतेजोबळें !
काळाच्या उदरात खोल अमुचीं आहेत गेलीं मुळें !
धाया पावनता, उदार समता, स प्रेरणा मानवा,
आहे भारतसंस्कृति क्षम सदा ती आर्यकुल्युद्भवा !"

जन्मानें अधिकारजाति ठरते, जन्मेंचि; नीचोत्तम,
वज्राभेद्य समाजधोरण असें झालें जियें कायम;
तेथें शुद्ध समाजनीति, समता, स प्रेरणा नांदती,
आढ्योक्तिप्रति ह्या मृषा करितसे प्रत्यक्ष सच स्थिति !

का 'अब्राह्मणवाद' नित्य अमुच्या मार्गीं पडे आडवा
याचा सारविचारबोध अजुनी आम्हा नको का हवा ?
नाना धर्मविमोह निर्मुनि जना केलें निसर्गच्युत,
ती कालोपहता समाजघटना कामा न ये सांप्रत !

येती भारतभूपटावरि नवे लाटा दमाचे गडी,
त्याचे डाव अचाट, जोम जबरा, ईर्षा महा धागडी !
निर्माया प्रतितोट त्यास अमुचें सामर्थ्य सर्वस्व जें
तें एकीकृत या विशेष विषमीं केलें तरी पाहिजे.

आपोआप घडेल इष्ट समयीं तें कार्य हें बोलणें
आहे भ्रामक ! युक्त काय सगळें काळावरी टाकणें ?
भागीदार कृतींत मानव असे कालानिसर्गासवें;
आणा त्यास समीप एकवटुनी यत्नप्रयत्नोत्सवें.

भावी भारतभाग्यसूचक महाचिन्हें दिसों लागतीं,
तों तों तीव्र समाजशुद्धिकरिता जाणीव होते अती,
ठेवूं कृत्रिम भेद कायम, कुणा अस्पृश्य मानूं जरीं,
स्वातंत्र्यास अपात्र आपण ठरूं, घेऊनि शापा शिरीं!

दास्यत्वात विलीन अज्ञभगिनी दवोनि ही आपदा,
होतें रक्त न तीव्र तप्त तुमचें आर्यांगनांनो! यदा;
बोला! नूतन भारतीं नवजगद्‌द्वारार्थ वीराप्रति
निर्मायास समर्थ काय तुमची नि:सत्त्व कुक्षिस्थिति?

तें स्वातंत्र्य खरें न फक्त अपुलीं जें तोडितें बंधनें,
अन्याच्या पदशृंखलास बघतें निष्कंप ऐशा मनें;
या त्या आपण बांधवू निजपदीं त्याच्यासवें प्रत्यहीं,
तोडू त्यास समग्र एक करुनी आकाशपाताळही!

ते आहेत गुलाम! दूर करिती जे रंजले गांजले!
ते आहेत गुलाम! जे निजजनद्रोहीं सदा रातले!
ते आहेत गुलाम! जे कचरती सोसावया सांकडीं,
ऐशा शापशिव्याहि सत्यकथनीं प्रीतीचिया आवडीं

• • •

## १९

# ह्यांत काय संशय

पाच मुखरिण मधें, मिळालीं नीळ आणि माणिक
सुतनु तव सगळयाहुनि आणिक !
निर्मुनि * नायकनरें दिला तुज पंजर काचनमय,
पढविलें ' ह्यात काय संशय ! '
' येती कवितेमधें फिरुनि जशिं पदें नित्य तींच तीं
त्याच त्या अर्थाप्रति दाविती '—

बोल उचलले तसे तेच ते फिरुनि फिरुनि घोळसी,
मजेनें मखरामधिं मुरकसी !
फुगवुनी छाति जशि करिशी मान वाकडी,
कौतुकें मान तशि तुकविति जन रोकडी,
तव करिते पोकळ कृति शून्यावर कडी,
डोल, डोल रे ! घोळ, घोळ रे ! नाच, नाच थै थय !
बोल रे !—' ह्यांत काय सशय. '

स्वप्रतिभारूपप्रतिबिंबा तव ठायीं लक्षुनी
डोलते मानवमति विजयिनी !
स्वगौरवार्थ स्वार्थपरायण नर तुजसम कोंडितो
पाखरें, पढवुनि कुरवाळितो,
तदाशय न समजुनी घोटिसी पाठ तोच अक्षय
होय ना !—' ह्यात काय सशय. '

---

* सर्व चराचरांचा आपणास स्वामी म्हणविणाऱ्या नरानें

स्वजनांचें परिवर्तन अनुचित पाहुनि मनिं गम्बड
घुवडही घव भर दिवसा दडे !
तें प्रचंड गरुडोड्डाण पखारि अने,
थुमटताच रव मैनामुखिं मुद्रा पडे,
अतरात वरकड निहगगण चरफडे
विजित आणि जेत्याचे पाहुनि खेळ हिटिस यापरा
'एक कुणि' तसाच तडफड करी !

• • •

२०

## पूर्ण कीं अपूर्ण ?

ये तारुण्य भरास पूर्ण अथवा प्रेमास ये पूर्णता
हाता ध्येय चढे, फुलें विकसलीं संपूर्ण कीं वाटतां,
याना पूर्णपदाभिषिक्त करितो जो मोहनीय क्षण
ह्रासारंभहि तोच होउनि घडे त्याच्या लया कारण

पूर्णाचें मन रूप कल्पुनि चढे उत्तुंग त्याचे कडे
काळव्यालकराळ, तेविं कसली कीं, ओढ त्याला पडे !
पूर्णाच्याहि पलीकडे मन पुढें गूढें पहाया उडे
जीवाचा जणु हाचि धर्म दिसतो जावें पुढें–त्यापुढें !

या चित्तास निरल्पवीचिविकळा, या ध्यानधारातुला,
शक्तीच्या मलयोद्भवादि दिसती लीला महोर्जस्वला

त्या संविद्ध मनस्थितींत जळती जीर्णें; नवोपक्रम
होतो शास्त्रकलादिकास, उदया येतो स्फुरद्विक्रम.

व्यष्टीची परिपूर्णता, मरण तें, यांत्रे विकासोन्नति
सृष्टीचेंहि तमेंच भूतविलय प्रारंभ तो बोलती.
हीं राहोत ! अगाध सृष्टिरचना संपेल त्याची जर
जाणा निश्चित कीं मरेल असला संपूर्ण तो ईश्वर !

• • •

२१

## कमळा

[ शिवाजीमहाराजाच्या कारकीर्दीच्या अखेरीला पुढील हकीकत घडून आली. थोरात आडनावाच्या मराठे सरदाराची कमळा नावाची एक रूप-गुणसंपन्न कन्या होती. संभाजी शिकारीस्वारीवर निघाला असता थोराताकडे उतरे. या शूर दिलदार, परंतु विषयासक्त पुरुषाची नजर तिजवर जाऊन त्यानें तिला शिवनेरी किल्ल्यात आणून ठेविलें. पुढें आपली पतगत झाल्याचें पाहून तिनें किल्ल्यावरून उडी टाकून जीव दिला. ]

नभःशिखेवर कोर चमकते चढत्या चंद्राची,
निकषावरची जशी झळकशी रेषा सोन्याची !

शुद्धाधिष्ठाना मुदमंगलमय सकल्पाचें
शशिखंडाला होतें मण्डन तैसें अंकाचें !

अत्युत्कट उत्कर्ष गुणाचा, तज्जन्य स्खलन,
मिळून अद्‌भुतरम्य मनुजता झाली निर्माण.

मृगलांछन त्या मानवतेचें परम रम्य चिन्ह
परंधाम परमेश मौळिवर मिरवि अविच्छिन्न.

चंद्रकळे गे ! चमक !—भरूं दे धावेसह धरणी—
भारतरमणी—गुणरत्नाकर—यशस्तरंगांनीं !

लोकोत्तर कोणे दृश्यावर जडलें तव चित्त
अढळ रंगलें, सांग दीप्तिमय एकच रंगांत ?

निसर्गदुर्गम सह्याद्रीच्या प्राकारांवरुन
शशिकिरणें गिरिदरित घसरतां होती संचूर्ण !

निश्चल झाला निसर्गातला धडधडता प्राण,
निश्चल वारापाणी, निश्चल कडे आणि रान.

निश्चल कालीं या शिवनेरी दुर्गप्रान्ताचें
प्रासादाचें उघडें दिसतें दार गवाक्षाचें.

कोमळ आहे कोणी श्यामा चिंताकुल बसली,
लावण्याची किशोरगंगा वाट काय चुकली ?

गूढत्वाचे, सुंदरतेचे, मायसधनतेचे,
नीळवर्ण हें द्योतक यांच्या निस्सीमत्वाचें;

मुक्ताचला नीलिमा तोच ही नीलदेह रमणी,
निळ्या सारणीमधें वाहतें मोत्याचें पाणी !

कृष्णकेश मोकळे, स्वेदकण तेजस्वी भाळीं,
कर्णभूषणांची बहुवर्णच्छवि गालीं पडली;

भ्रुकुटींच्या महिरापांखालीं नेत्रांचें युगल
निमिषोन्मेषीं निर्मी नूतन नवल सृष्टिगोल;

चारु चिबुकनासिकादि गात्रें सारीं निर्दोष,
रुद्ध करुन ठेविले वदलत्या त्यांनीं शोभेस !

ॐ ॐ ॐ

नरनारीरत्नाचा आकर महाराष्ट्रदेश,
बलविद्याचापल्यशीलशोभेचा अधिवास;

इहामुत्र कोणाहि विघातक रोधक सत्तेस
लवला नाहीं लेश कधीं हा तेजस्वी देश.

चिच्छक्तीच्या कार्यक्षम या केंद्रस्थानांत
प्रथित मराठेकुळांतील कुळनामें थोरात,

त्याच कुळींची कमळा होती एकुलती एक,
श्रीमंताची, सरदाराची, थोराची लेक.

शठ कपटी संभाजी, आणी गणगोतामधुनी
कपटजाळ विस्तरुनी ही अव्याजसरल तरुणी.

विकसोन्मुखलावण्य--शुद्धशालीन्यसुगुणशाली
मतंगजें ही नलिनी उपडुनि हतजीवित केली !

नीलजलज कलिके गे ! नच तू उमललीस पुरती--
पावलीस उदयींच जशी लय कोणी शुभद तिथि.

सरसवसंतशिरोभूषण गे ! तूं असतिस झाली,
परी क्रूर हेमंत बहर तव नवतीचा जाळी !

कान्तकपोलप्रान्ता उन्मत्तानें चुंबियलें
विशुद्ध पुष्करिणींचें पाणी विषसंकुल केलें.

तव तन्चगा विटला पडला त्या अधमागाचा
चदननिटपा जसा लपेटा जहरी सर्पांचा !

कनकप्रभ नवभानुवैभवा साडुनि, रे नीचा !
धरिला लोभ क्षणभंगुर विषयाच्या कांचेचा

त्याचमुळें तव राज्य निमालें, हीन मरण आलें,
शुद्रारम्याचे मूकशाप संभाजी ! तुज भवले

❀ ❀ ❀

*तमालदलसन्निभाभिरामा ती वोल्ह गेली*
*वनराजीसह शरच्चंद्रिका ईषदेक हल्ली !*

"*आठवतो*"—*वदली ती*—"*मजला तो धातक दिवस,*
मोह अजूनहि पाइं बघतो जो मृतचित्तास,

*निळ्या अंबरीं निळी निशा ओढुनी निळी बुर्खी*
उत्कठेनें येता लक्षी 'कोणाला' पर्थी,

नेत्र तिचे 'त्या' नेत्रा मिळता लाल्बुद झाली,
घाबरल्या रजनीची पटकन मग सध्या वनली,

मखमालीच्या तन्तकणान्या आस्तरणावरती
रात्या कमळाच्या कुर्णि रचिल्या पक्ष्यांच्या पक्ति

गावाच्या बाहेर वनीं मी तें पाहत होतें,
अकस्मात युवराजाचीहि स्वारी ये तेथें

*अवखळ वाजी, फेस मुखीं, उच्छृंखळ गति त्याची,*
धामानें वर टवडवलेली मूर्ति स्वाराची

लाल नयन, मुख लाल, करीं समशेर लल्लाल,
वेष शिकारी, उन्मादें मन झालें वेताल;

गौर तनूवर नूर विराजे, खुले वीर वृत्ति,
क्षणात टाकुनि उडी खालतीं मज धरिलें हातीं

हिरवे, पिवळे, लाल, गुलाली, रजनीचे रंग
पटपट बदलुनि निवळुनि झालें नितळ तिचें अंग.

꙳ ꙳ ꙳

"भानावर आलें तों दिसलीं, पाहें जव भवतीं,
काळोखाच्या बुरख्याखालीं दडलेली जगतीं

अस्तित्वाचें भानहि नव्हते केव्हांही जीचें,
कटक तेज अनुभविलें प्रथमचि आतिल ज्योतीचें

ज्ञान मनाला अंधाराच्या रूपाचें नव्हतें,
इच्छेविण तें जिवत आलें साक्षात्कारातें.

परमेशाचे हेर पहा रे नभिं होते देत,
मिचकावुनि निजनयना होते मज चोरुनि बघत.

सळ्यानीं तापल्या डागिलें त्यानीं मम भाळा,
चव्हाड मुख तें दाखाया मज धीर न कोणाला.

अपापमन स्वप्नींहि न पाहे चित्र वाइटाचें—
जाणे एकचि गंधर्वाच्या पुरिं भटकायाचें.

बुजलें नव्हतें रानपाखरूं जें कवणे काळा
भय न तयाला दे शिरताना अंधेरा जाळी.

कटु अनुभव परि लिहिला होता गे! त्याच्या भाळीं
येई नये दारिद्र्यातहि जो घोणें काळीं.

देवाची, धर्माची, वाहुनि वडिलांची आण
सहज सर्व त्या विसरुनि झाला खळ तो बेमान

शकुंतला, शर्मिष्ठा, कन्या क्षत्रिय ज्या अन्य,
टेंलुनिही गुरुजनांना झाल्या धन्य जगन्मान्य;

देउनि हे दृष्टान्त जुने ऐकाया अति गोड
अपकीर्तीची मात्र करुन मज दिली भली जोड!

निर्धाराच्या, सत्याच्या, त्या खऱ्या अटळ मेरु,
घसास करि उतरावी त्याच्या मी पामर भीरु?

* * *

"ताताच्या मनिं होतें कीं मज युवराजा द्यावें?
अप्रिय नव्हता मजही तो, हें कशास लपवावें?

शिवरायाचा सुत वचनाला अपुल्या जागेल,
कलंक माझा कांहींसा तरि धुतला जाईल,

या आशेवर जगलें, पण मी सर्वस्वीं फसलें,
कारण वाचायाचें आतां क्षणभरही नुरलें!

सांडुनि गेलें जळ, दुर्दैवी तसाच तान्हेला,
काय होय त्या बहु मोलाचा पाचूचा पेला?

थोराताच्या पाक कुळीं जा जन्माला आली,
राख म्हणुनि घ्यायाचें आलें आज तिच्या भाळीं!

कुलवंताच्या कन्या जीणें जें लाजिरवाणें
त्यागुनि आदरिती मानाच्या मरणाचें जीणें.

भलभलतें मजविषयीं बोलत असतिल जनलोक,
शल्य मना हें प्राणान्ताहुनि जाचितसे अधिक.

विधिविरहित आलिंगन-चुंबन देहाला घडलें,
याहुनि दुसरें घोर घडावें पातक तरि कसलें ?

परपुरुषाच्या सत्तेखालीं येथें मी आलें,
पवित्रतेचें डंफण तेथें मिरवावें कसलें ?

म्हणोत जन, पण म्हणूं नको तूं गे माझे आई !
'कुळबुडवी कारटी कशाला जन्माला येई !'

मनांतलें मन बोले कीं मी आहें निर्दोष;
खोटें सांगत नाहीं, आई अंबेची साक्ष.

कौमार्याचें झालें असतें व्रत माझें भ्रष्ट,
त्याच क्षणिं प्राणाला केलें असतें मीं नष्ट.

परंतु आलें काहुर मजवर ज्या आरोपाचें
शुद्ध रक्त प्रोक्षुन मी करितें परिमार्जन त्याचें

ज्या देहावर पडलें आरोपाचें आवरण
तोच देह मी मोह सोडुनी देतें फेकून.

भार्या ललना वदोत नच कीं कमळेनें लपुन
चित्तशुद्धिच्या ढालेखालीं वाचविले प्राण !"

❀ ❀ ❀

क्षणैक दृष्यी शरच्चंद्रिका पुनश्च सहितरन
क्षिप्र अनन्तीं नितान्त विश्वप्राण होय लीन.

नश्वर देहा दरींत फेकुनि त्या बुरुजावरुन
प्राणविहंगम करिता झाला हा भव्योड्डान

त्याला तेव्हांपासुनि 'कमळाबुरुज' लोक म्हणता
नरनारीजन पोवाडा हा अजुनि तिचा गातां.

• • •

२२

## आम्ही

अस्ताव्यस्त इतस्तता पसरलीं हाडें, युगें लोटलीं,
होते कोण कसे न आठवण ही कोणा जरा राहिली,
गोळा होउनि तीं पुनश्च उठतीं, शब्दें बसू लागतीं,
होते कोण, किती असे जगऋणी, प्रत्यक्ष तें सांगतीं

हें पुर्वीसरमें घटोनि अमुच्या एकाच ये अद्भुत,
सामर्थ्यें पुरवीत आजवरती आलों जगा शाश्वत;
अंगा फासुनि राख खन बनलों आम्हा फिरस्ते जरीं,
आशा केवळ एकटीच अमुची राणीव विश्वीं करीं

श्रीरामांत पहा प्रताप अमुचा, ऐश्वर्य कृष्णीं पहा,
रुद्रीं उग्र कठोरता, सदयता बुद्धांत साक्षात् पहा;

ते आम्हींच महंमदास दिधली खैरात पैगंबरी,
तें कारुण्यहि आमुचेंच उठवी जें ख्रिस्त मेल्यावरी.

भावी सत्कवि, ते चिकित्सक पटु, प्रख्यात अध्यापक
मंत्री नाविक वीर दार्शनिक ते व्युत्पन्न वैज्ञानिक;
आहे ह्या घडवीत आज अमुची चिच्छक्ति या भारतीं
मत्तां मर्दुनि द्यावया अभयता संत्रस्त भूतांप्रति.

हिंदुस्तान पहानयास अमुच्या नेत्रें शिका, या कसे,
रोखायास तुम्हांस शक्ति मग या जंजाळ काळा नसे !
होते सृष्टि नवी, कलेवर जुनें टाका, तुम्ही व्हा तसे,
हें ना होय तरी मरा ! न तुमची कोणास पर्वा असे !

• • •

## २३

## गिरिगान

उदयगिरीवरच्या पृष्ठीं उदयोन्मुख सारी सृष्टि.
नित्यविकासपरायणता ही काळावर दे सत्ता.

ब्रह्माटा घालुनि फेरी वायूच्या येती लहरी.
लपेटती त्या रणत्करा कणखर शैलाच्या शिखरा.

तेजाच्या लहरी येती उन्नतवक्षीं आदळती,
परावृत्त तेथुनि होती भोंतालीं–प्रान्तोप्रान्तीं.

अस्फुट वर्णांच्या पंक्ति अव्यक्तांतुनि कोसळती,
उघडपणें रूपां येती हिमस्नात कालिकांवरती.

नेत्रांस न अग्रें दिसती आढ्य द्रुम जेथें असती,
गवताचें छोटें पातें उत्साहें तेथें डुल्तें.

प्रचंड खगपंक्ती जेथें आकाशा फोडित जाते.
पतंग तेथें निःशंक फडकावी चिमणे पंख.

तुंगनगोत्संगीं ललिता गंधलता दिसती झुलतां,
कुसुमित कोरांटिहि पसरी निजरंगच्छवि-तनुलहरी.

एकेका हिमबिंदूचीं पाकसुरत लावण्याची
अत्यद्भुत अंतःसृष्टि गिरिशिखरीं येते दृष्टीं.

गत झाले ज्यांचे प्राण त्यांस मिळे पुनरुत्थान
या शाश्वत प्राणागारीं ऐश्वर्याच्या माहेरीं.

विद्युन्मय स्वातंत्र्याचे श्वास वाहती अद्रींचे.
विशालता ही विकसविते व्यक्तिदृष्टिसंकोचातें.

परम सूक्ष्म अंतःकरणीं निजकिरणीं साक्षी कोणी.
रेखी दिव्यें; कांहीं तीं साम्राज्यें होउनि येती.

तडिल्लताहास्यप्रभव उग्रवीर्य मारुतदेव
अजलबळ वीरप्रवर दानवहंता वज्रधर

वरुण, सोम, पावक तरुण, अरुणादिक निजजनकरुण
सुरगण ते अनुदिन रमती गिरिशिखरश्रेणीवरती.

पुरा आर्यशाखा यांनीं विजय दिले संपादोनी,
ज्ञान देउनी अपरिमित ग्रस्त जगां केलें मुक्त !

उषःकाल तो आर्यांचा जनिता परमाश्चर्यांचा.
महोदार नवघटनेचा मानववंशविकासाचा.

भाग्याची ही उषा पुनः जरी प्राप्त व्हावी अपणां,
चला जाउं या गिरिगहनीं महा सिद्धिमूलस्थानीं !

• • •

२४

## तूं देशी न तुझें

I prithee and me back my heart
Since I cannot have thine.
*Sir John Suckling ( 1608--1642)*

तूं देशी न तुझें, कशास मग मीं द्यावें तुला आपलें
दे माझें परतोनि चित्त मज जें ठायीं तुझ्या गुंतलें.
छे ! तें ठेव तमेंच. नाहक नको तो शीण का कीं, हटें
माझें चोरुनि चित्त नेतिल पुन्हा डोळे तुझे चोरटे.

एका संकुचितान्तरीं उगिच कां चित्तद्वया दाटणी
दोघांची मिळणी जरी न घडते एकान्त एकासनीं ?
कोठें तें सदयत्व सांग, हृदयें फोडोनिया, आपणा
ठेवाया सजलीस दूर जरि तूं स्नेहानुबंधाविना ?

वाटे प्रीति मला महा विकट ही कूट स्वरूपें असे.
ती निर्धार मनास एकहि धरूं देना. करावें कसें ?

भासे, आकळिलें रहस्य सगळें प्रेमप्रमेयातलें
तों तों चंचळ होउनी मन पुनः शंकेमुळें गोंधळे.

चिन्ते, यास्तव जा त्यजून मज, तू खेदाहि जा, या क्षणीं,
नाना व्यर्थ कल्पनि तर्क तुमच्या संगें झुरावें कुणीं ?
माझें उघट चित्त—तेंवि सखिचें माझ्या ठिकाणीं—असे
ऐसें भावुनि वाट पाहिन तिची नि शंक मी मानसें

• • •

२५

## विचारतरंग

नीलप्रभ निर्मळ गगनीं विशुद्ध वाहे सुरतटिनी
पारावारीं समरठुनी रमती विधुधरमणरमणी.

चद्र सुधामय पुष्करिणी गगनाला शोभा आणी
दीप्तींचीं लेवुनि दुकुलें तारागण तेथें जमले.

क्षु ब्धार्णव जल मग्नाला दाखवितो हे मार्गाला
भोगाचा कर्तव्याचा मेळ मनोहर हा साचा !

वाटे, तारा होवोनी विचरावें अनध्या भुवनीं
धरणीच्या हृदयावरती ठेउनि कर हस्तावी ती !

विहगमोत्तम कीं व्हावें आकाशीं वरवर जावें !
नूतन नूतन प्रातातें आक्रमुनी जावें वरतें.

उदयगिरीच्या पर्लीकडे वालरवींचा किरण पडे
प्रथम करुनि त्याला प्रणती शुभवार्ता कळवू जगतीं—

" घोर निशा सपुन गेली ! मगल वेळ जवळ आली !
खत सोडुनी कामाला लाग, रवि उदया आला

हताश जे झाले स्वजन चैतन्याचें सचरण
घरणें त्याच्या देहात भाग्य हें थोड्याना प्राप्त !

सोप्या सोप्या शब्दानीं, स्फूर्तिमूत्रानें गुफोनी,
मजुळ मजुळशीं गाणीं रचुनी रसिकान्त करणीं

हळू शिरावें चोरोनी, जावें मीपण लोपोनी,
हौस मनीं ही असे परी टीका तीतें विफळ करी !

अ त क र ण प टा व र ती आत्यतिक वेगें उठती
दिव्य लेख उन्मेषाचे धरावया ते स्मृति काचे.

बुद्धीच्या भिंगावरती बिंबित ज्या प्रतिमा होती
शब्दचित्र त्याचें कसलें नकळे काढिल मन दुबळें

स र स्व ती क ठा भ र ण वाचुनि हें धरचें कवन
गद्गद वदला हासोन " धन्य कवी ! कविता धन्य

शब्दचमत्कृति यांत नसे, गाभीर्याचा लेश नसे,
सत्याचाहीं गंध नसे हनुमताचें पुच्छ जसें ! "

वानर होता नर झाला म्हण लागलें प्रहगोळा
धूमकेतु गगनीं आला विषय असे घ्या कवनाला.

सिद्धान्त घेउनि शास्त्रांचे धरा कथन त्या सत्यांचें
पुरे पुरे कल्पना पुरे काळ मागला आज सरे.

यावा थावा रसिकवरा! गदारोळ हा पुरे करा!
प्राण कल्पना काव्याला न कळे हें मतिमदाला

एक न धड भाराभर ती चिंध्याची खोगिरभरती
तुटपुज्या ज्ञानें फुगती रमज्ञ अपणाला म्हणती

पडितपण तें रसिकपण बहुधा असती हीं भिन्न
दोहोंचा अन्वय एकीं साम्प्रत दुर्मिळ ह्या लोकीं!

म हा रा ष्ट्र क वि प र प रा खड न पडला तिला जरा
उणीव रसिकांचीच परी आज भासते खरोखरी

भौतिक शास्त्रीं वा काव्यीं कल्पनाच वैभव मिरवी
अभेद मज दोहोंत दिसे कोण शहाणें, कोण पिसें?

जें जें विश्वीं ज्ञेय असे त्यांत कल्पना मात्र वसे
करा कल्पना वजा बरें म्हणजे बाकी शून्य उरे

संगम हृदयगम साचा मृणाल अलि या युगुलाचा,
अथवा सज्जन रसिकाचा सहजमनोहर कवितेचा!

• • •

२६

# अनुकार

[ 'विचारतरंगा' वर करमणूक १२।१०।१२ च्या अंकात 'आधुनिक कवींची कुरकूर' प्रसिद्ध झाली आहे 'तरगा' चा ओघ या लेखकाच्या लक्षात आला नसावासें वाटते प्रतिध्वनीवर रागावण्यांत काहीं अर्थ नाहीं आजकाल कवि बनणें जितकें सोपें, त्यापेक्षाहि टीकाकार बनणें फार सोपें आहे ]

दोष कुणाला ? एकदा निखालस बोला

भूमृत्कटकावृतवनखडी,
कटु वाग्जल्पनताडव माटी,
प्रतिध्वनिप्रति परिसुनि साडी,
निज भानाला एकदा निखालस बोला.

अंतर्वीणाततुततींना
कठोर हस्तें करी ताडना,
कर्कश रव कर्णी पडतांना
येत रलीला एकदा निखाल्स बोला

नि स्वार्थी सारस्वत तीर्थी
पंक त्यावरी फेकी जाता,
कोणा या स्वैरास वारितां
निंदी त्याला एकदां निखाल्स बोला.

प्रकृति-सदभिरुचीचें युग्म
आहे प्राक्तन-संस्कारासम.
विसरुनि तद्वचित्र्य मनोरम
कोपा आला. एकदा निखालस बोला

व्यासोच्छिष्ट जरी जग सारें
का झाले होतात पसारे ?
उष्ट्या जगतीं जन्म हरे ! रे !
का सराला ! एकदा निखालस बोला

विश्वविभूषण पुष्प हवें ना ?
दुखवुनि लघुगुरु तरुलतिकाना
न मिळे ! आता पुरे विघटना
जीव तान्हेला ! एकदा निखालस बोला.

अमोघ बळ शब्दाचें पाहीं,
आत साठवा अनन्तासही
शब्दें शब्द कसा मग जाई
हा हाराला ? एकदा निखालस बोला

अधार नगरचा उल्टा न्याय,
अदंड्य दंडा भाजन होय,
पय घटिका पीं, घड्याळ, हाय !
खाई टोला एकदा निखालस बोला

• • •

# २७

# नागेश

( मासिक मनोरंजनांतील ' माझी कविता ' वाचून )

स्वैरालापमनोज्ञभावनिवहा तारस्वरें क्षेपुनी,
टाकी त्या मधुरें निनादनिकरें दिक्प्रांत संव्यापुनी,
तो प्रेमाकुल कोकिल स्वरमणीसाठींच ह्या रजना
आरंभीं यदि, काय तें न करितें सानंद अन्या जनां ?

कां होतोस विषण्ण काव्यविटपाग्रारूढ हे कोकिला ?
लागावा तुज वामनें वद कसा पाषाण जो फेकिला ?
पादाघात-सरागवीक्षण-सुहास्यालिंगन-प्रोक्षणीं
आहे वाग्वधुनें सुमान्वित तुझा उद्यान केला क्षणीं.

मातें रानवटास ये न निविधालङ्कारनामावलि
गुंजा-कांचन-काचरत्न-निचयें हो वा न हो वाकली
व्यापारी जन आदरोत असलीं लेणीं; मदीयांतरीं
आहे ती रुचिरा निसर्गमधुरा नागेशवागीश्वरी !

आहे भूषणहीन वाग्वधु तुझी ना व्यंजना का मुळीं ?
हें आश्चर्य ! वधू विरक्त न कधीं म्यां ऐकिली पाहिली !
मुग्धा शास्त्र विदग्धधींस न पुसे, ते पूज्य हें तों खरें
व्हावी ही गुरुमंडळी पण—? पुढें बोलूं कशाला पुरें !

टीकाकारमतानुसार रचना जाता करूं स वर
रम्योद्यान उजाड रान अवघें होईल, शंका नको !
व्हावा नष्ट ' विशेष ' इष्ट न मुळीं वैचित्र्य ज्याच्यामुळें
त्यांना काय रुचे मला न; बहुधा त्याचें न त्यांना कळे !

• • •

२८

# चांदणी

कवितारस झडकरि मनांत यावा—पुण्याचा ठेवा;
दाता परि नीरस काय करावा—जन मार्मिक व्हावा.
—रामजोशी

चकाके 'चुनी' मुदांवरची, चांदणी तसलिच नवलाची!
साज मय तेजाचा करुनी लखाके किति कोमल किरणीं!

तिचें तें उदित तेज पिउनी जनवन गेलें वहकोनी!
प्रौढपण निज निपट त्यजुनी वनली पोरच जणुं धरणी!

गिरि गंभीरपणा त्यजुनी पाहतो शिर वरवर करुनी.
नेत्रपुट तृण झटपट मिटुनी खिळले चुळवुळ विसरोनी.

खगगण शब्दविषय फिटुनी गेले ठायिंच विरघळुनी!
जटिल वनदेव वावनळुनी भ्रमे वनिं शमदम गमवोनी!

कुठें तो स्वर्ग, कुठें धरणी! चांदणी त्यांची नच कोणी!
मग ही हृदयंगम करणी काय ये 'निष्कारण' घडुनी?

कर्कश शुष्क तर्कनिपुण प्राज्ञवर पंडित परिपूर्ण
मात्र हे विशाळ 'मणिगोटे' भिजले नच सद्रसलोटें!

नजर न त्यांचेवर ठरते, डरावर जड दडपण पडतें.
ग ह न वि द्व त्ता प रि ता पें प्राकृत जग थरथर कांपे!

सुंदर मंजुळ मधु मृदुल भूतिवल्लमुदमंगल-मूल
भावमय सत्‌चित् जग असलें, त्यास हे प्रज्ञाघन मुकले.

चमक गे तारे! तूं गगनीं आपुल्या शीतळ किरणांनीं
शान्त सम शुद्ध तुझें तेज, रुक्ष जीवन रंगवि सहज.

ख्याच निज हृदय साच करुनी गाडिला जगदीश्वर ज्यांनीं,
तुज तें 'अल्पतेज' म्हणती, क्षुद्रपण उघडें निज करिती!

उंच · अति-मनुजशिरावरती असे तव सतत सहज वसती·
तेज अभिषिक्त ज्यांस करितें, तयांचें स्वयं समर्थन तें

प्रौढपण मज निज विसरूं दे, दिव्य तव तेजीं मिसळूं दे;
शुद्ध अद्भुतरस उसळूं दे, जगज्जीवन जगिं कवळूं दे.

काव्यगगनांगणगत नवल 'बालकवि'-तारा अति विमल.
हाहि सरसोज्ज्वल कवितांहीं जीव मम बुडवी सुखडोहीं!

• • •

२९

## प्रभात-पोवाडा

[ महाराष्ट्राच्या प्रभातकालात मावळातील देशपांड्याच्या येथें गोंधळ संपण्याच्या वेळीं एका गोंधळ्यानें म्हटलेला पोवाडा. ]

शूर मर्द महशूर देश दख्खनचे सरदार,
मानकरी बारगीर बाणेदार शिलेदार.

गावगांवचे मिळोनि भरली मजलस भरदार,
कवन कोणतें गावें करितो फिकीर शाहीर.

रूप भयंकर सुंदर, वागवळ थोर जोरदार,
पुराणकाळाचे अंगावर झगे चमकदार.

पूर्णकर्वाभर तेही सादर सदरेला झाले,
सिद्धरसाची गिरा सर्वांची नागर वच बोले—

"*विचार करणें कशास*" म्हणती "*कवन म्हणायाचा?*
*काय शिरस्ता तुम्हां न ठावा शाहिरपेशाचा?*"

"असे विषय गायाचा एकच अक्षयचा त्याचा
"क्षात्रवृत्ति उपन, विवर्धन, रक्षण करण्याचा."

चिरंजीव गत शाहिरांनो! हीच धरून शिस्त
विद्यमान शाहीरमंडळी जाते नेमस्त

*यश प्रशस्त्या, विजयकथा*, ते समरचमत्कार
*वीरपुरुषपुरुषार्थ निर्मिले* आपण साचार

अजब, मातबर, अगाध याहुनि भारदस्त कांहीं
फिरोनि ऐसें, मान्य अम्हाला कीं होणें नाहीं

गतास वदूनि, गफलत सोडुनि, निजमार्गे चालू
वर्तमानकालाची बाजू आम्ही सांभाळू

* *चौशतकाची दीर्घ झगपट ही चालू आहे,*
महाराष्ट्रजनसागर सगळा खळबळला आहे

*हिंदुयवनशीलांतिल जो जो भिन्न भाव आहे*
*त्या दोहोंतिल उत्तमतेचा हा झगडा आहे*

---

* मुसल्मानांचा दक्षिणेंत प्रथम प्रवेश, इ. स. १२९४

भरतखंड रणआखाडा, झुंजार मल्ल दोन्हीं,
निर्वाणीची दारुण त्यांची चाले झोंबी हीं·

स्वदेशजनधर्माचा जीर्णोद्धार करायातें
झुज मातबर समोरार हीं घनचक्कर होते·

हुल्लड हल्ला दौड गराडा घाला अवचीत,
शिकस्त खाणें, दुष्मन करणें चौमुडी चीत,

मोड पळापळ झोड, जयाची आशा हिरमोड,
फसली मसलत, अगा आली बाजू बिनतोड,

वीर यशस्वी, वीर अपेशी, वीर रणीं पडला,
समान नागाजितों कडाकुन या सऋळीकाला.

सर योद्धे करितात ल्डाई कमाल शर्यीनें,
पतन सोशिती त्याहून जास्ती जबऱ्या हिमतीनें.

यास्तव आम्ही हार मानितों जीतीसम थोर
रणखदाळीं कडोनिकट ही गातों घनघोर.

जीव कुडीसम शाहीराची मर्दाची जोडी
एकामागें दुजा तगेना लगे प्राण सोडी.

* * *

सभाजनानो ! असे प्रार्थना तुम्हा शाहिराची
खबरदार होऊन खबर ऐकावा दुनियेची.

तुरी पैरवी पृथ्वीवरती हिंदूंची काही
जणू मनसुबा असा करी की सालिम दुनिया ही.

चौकिपहारे उत्कर्षाच्या टेवुन हमरस्तीं
हिंदुस्थानीं बदी केली हिंदूंना पुरती

कहीकवाडा वाहुन किंवा वेठविगारींनीं
पोट भरावें दुनिया म्हणते हरदम हिंदूनीं

विसर विसर मस्तानी दुनिये ! तुझी बात पहिली
नजरबद हिंदूची आता नजर खुली झाली.

हिम्मत हिकमत धमक जोम निर्धार तडफ नेट,
धाडस धोरण हुरूप अक्कल पोच अटोकाट.

स्फूर्ति कल्पना प्रताप अघटित घटनासामर्थ्यें
पूर्वी होतीं, आता असती बघता सत्यार्थ्यें

समुळ बुडाचा हिंदू मर्जी असेल देवाची,
राजी आम्ही. करून जाऊ करणी मर्दाची

जनचित्ताचें समुद्रमथन दिशा दक्षिणेनें
चालविलें बहु काळापासुन हिरशी चुरशीनें

'स्वतन्त्रता' शिरताजरत्न वर उदरातुनि येई
चतुर मराठ्याकरीं प्रबळ अभिमानें ती देई

काळ मागला शोधुन बघता दृष्टीला दिसतें
एके वेळीं एक राष्ट्रची इतरांचें नेतें,

पुढिल पिढ्याना मानवतेच्या आस भरोशाला
एका वेळीं जामिन एकच देश होत आला

देश मराठा लोक मराठा कुळ बरकड देशा
नेता जामिन आज एक हा, नाहीं अंदेशा.

जय अपनय या स्वातन्त्र्याचे युद्धीं येतो कीं,
म्हणाल नकळे याचा शेवट कैसा होतो कीं

कोण यशस्वी युद्धें झालीं मागें सर्वस्वीं ?
काय जगीं निर्भेळ यशस्वी सांगा आम्हांसी ?

आर्यराष्ट्र कृतकार्य कधीं का तें होतें झालें ?
कार्य निसर्गाचें का सांगा पूर्णतेस आलें ?

विजयाचेही पोटीं मोठीं कार्यें उद्भवती
अधिक झटापट करणें लागे ज्याच्या सिद्धयर्थी.

जनचित्ताला खळवळणारें एक ध्येय कांहीं
जगदन्तापर्यंत टिकेसें कायमचें नाहीं.

ग्रहगोलांच्या निर्मळ ज्योती खुल्या हवेवरती
अंतराळगर्भांतुन पोहत पृथ्वीसह जाती.

काय तयाचें रहस्यमय तें साध्य न हें कळतें
अचाट सुखमय आहे ' कांहीं तें ' निष्ठा म्हणते.

जीवितगंगा त्याच एक आनंदसमुद्रातें
प्रचंड वेगें गाठायातें धूमधडक जाते.

दैव मानवा साध्य सहज तें मिळवुनिया देतें,
विपरित होतां हिसकुन नेतें असें असेना तें.

देशकार्य मागल्या पिढ्यांचें थाबुन का पडलें ?
धडे मागले गडी मराठे विसरुन का गेले ?

वृद्ध शुद्ध हतबुद्ध आपले कोणी का झाले ?
रस्ते भुलले, चळू लागले मार्गे रेंगळले ?

सरा पुढें पिळदार मराठे गति दुसरी नाहीं
तरुणाविण तो कार्यभार मग कोण शिरीं वाही ?

हेटकरी मावळे, देशमुख, पांडे रणवहिरी,
दरकदार, रामोशि, धारकरि सराईत भारी;

एक एक हंबीर वीर हा वर्णवे न कांहीं
जय करण्याची चिंता अंबा जगदंबा वाही.

स्वधर्मकाव्यज्योति अखंडित तुम्हांमुळें जळती,
राख तयांची होती सुरता तुमच्या जर नसती.

प्रबळ शत्रु खेटतां तेज ये मुळचें प्रगटोनी
चला दाखवा तया मराठी भाल्याचें पाणी.

धर्मशिळेवर पाय ठेविला तो मार्गे घेणें
पूर्वजांस तें उणें, आपुलें हसुं होइल तेणें.

पहा पहा ते पितर आपले काय वरें म्हणती—
"आमाळांतुन पडला का हो! तुम्ही धरेवरती!

"भरीव छाती बळीव भुज हे दिले तुम्हां आम्हीं
"स्वोदरपूर्तीकरिता केवळ आणुं नका कामीं.

"डोळे वाणी अमुची बघते वदते त्यांत तुम्ही
"जीवल्लतेची नवती अमुची फुलली, तेच तुम्ही.

"स्वप्नजागरीं पटछायेसम आम्ही सांगते
"कारित मोकळे आहों तुमचे विजयाचे रस्ते."

* * *

काल बदलला, ध्येय बदललें, पूर्वपुण्य फळलें;
अभिनवभारत जन हो! आता जन्माला आलें.

चित्र मागलें तुम्हापुढें मीं एक उभें केलें
ओळख तुमची पटते का हो वदा त्यांत पहिलें.
चढती दौलत, वढता होवो वेल मराठ्यांचा
जय मराठे! जय मराठे! जय बोलो त्याचा!
नव्या उमेदी, नवे जिव्हाळे, नव्या मराठ्यांचे
नवे भरोसे, नवें कवन हे नव्या उमाळ्याचें

• • •

३०

## क्षणभर—

काटेरी वेलींचें जाळें
रुक्ष चर्म, गाठानीं भरलें;
अग्रावर पण निर्मळ ढवळें
होतें एकच कुसुम विकसलें!

कृष्ण निशा; अंभोधर घोर
ग्रसित करी गगनश्री सुंदर;
परंतु होती एक शिरावर
प्रसन्न तारा नयनमनोहर!

तें—ती असता एकएकटी
सुसह्य होय ती भयाण सृष्टि;

स्वर्गतिनिरयगतिप्रत्यय दे
जी एका समयावच्छेदें.

नित्य निराशेचें अवडंबर,
जीर्णाशेचें जाल निरंतर,
करूनि तुज मन्मनीं पुरःसर
व्यथित जिवा सुख देती क्षणभर!

• • •

## ३१

## भगवा झेंडा

विस्तीर्णाब्धीवरि उसळतां पर्वतप्राय लाट
होती कोणी क्षम नच तिची आडवायास वाट;
किंवा जेव्हां अवचित पडे वीज वेगें महोग्रें,
होती उन्मूलित उलथुनी भूभृतांचीं उदग्रें.

हा खालीं, हा वरि, जरि दिसे बिंदु तें एक पाणी
हा मागें, हा कण जरि पुढें, भिन्न तेजें न कोणी;
जे जे होती प्रचलित समप्रेरणैक्यप्रभावें
त्यांना ही अप्रतिहत गति प्राप्त होते स्वभावें.

येती पाण्यावर बुडबुडे पांढरे डौल्दार
प्राचीचा दे प्रचुरतर त्यां चारुता जादुगार.

चित्तां त्यांना स्तिमित करितां स्तंभिता ये जनाचे,
हें तो नोहे स्थल परि लसत्-शक्तिसंक्रीडनाचें !

कारागारस्थित सुखरां राघवें मुक्त केलें
जेव्हां त्याला अतुलित बळीं कार्यकर्ते मिळाले.
साधायातें अविकल जगड्व्याळ सद्ध्येयसिद्धि,
लागे तत्तुल्यचि अति बृहत् साधनांची समृद्धि.

भाराभार्ये, पृथ तरि वृथा,साउलीं पर्वताची
शास्त्रीं तुच्छ स्थिति बहुजना नेमिलीं या परीची;
गेली नैसर्गिक मनुजता, दैन्य ये नैष्ठिकांना,
झाला तेथें अविरत विपद्धेतु धर्म प्रजांना.

जीवेशांचा निपट निवटी भेद जो संतवृंद
त्यातें होता अभिमत महाद्विग्रही जातिभेद
वाटे ऐसें पढुनिहि सदा संतवृत्तान्त भावें
तें थोरांचें हृदय कळलें त्यांस कैसें म्हणावें !

येऊं पाहे परम भरती राष्ट्रभाग्यान्तरंगीं
शिष्यांचा हो नियत उलटा संघ त्या त्या प्रसंगीं
स्थैर्यस्वास्थ्यें बिघडुनि जणूं सृष्टि उत्पन्न होते
हे पुण्यात्मे म्हणुनि झटुनी झुंजती टाळण्या तें !

होतें जन्मार्जित खटतर स्वीय वर्चस्व नष्ट
दुष्टाचारा चलित करिती कारणें या वरिष्ठ;
बंडाचें तत्क्षणि उभविती काळवेत्ते निशाण
जाती लोकप्रगतिपर या 'पंथराजें' सुजाण.

जे जे कोणी रडत बसती मागिलातें स्मरोनी
सद्य स्थाप्यावर उसळती सिंहनादा करोनी
त्यानीं हास्यास्पद विकृत ही वृत्ति आता त्यजावी
प्राक्कालाची प्रगतिपरता तेवढी मात्र घ्यावी.

'मागें केल्या कळुनिहि चुका आमुच्या पूर्वजानीं
नाना कृटें रचित बसले आणि गेले मरोनी,'
उद्वेगें हें वच नच वदो आमुचा वश भावा,
सुज्ञें कालोचित कृति अशी आज काहीं करावी

झेंडा बडास्तव उभविला भव्य गेल्या पिटानें
स्वोत्पन्नाच्या करिं निरखुनी जाय तो साभिमानें
जेथें जेथें कटु विषमता आणि अन्याय गाजे
तेथें तेथें झगडुनि जना बंधनिर्मुक्त कीजे.



## ३२

# काव्यानंद

दैत्यानो ! न समुद्रमथन, वृथा येथें वळाची कथा
येथें वायुसुता ! हतप्रभ तुझी उड्डाणदर्पप्रथा.
होतें अक्षमवेग यद्यपि जगच्चक्षो ! तुझें दर्शन
वाया केवळ वादपाटव न हें वाचस्पते ! वाग्रण.

येथें अद्भुतरम्य नित्य पडलें स्फूर्तिप्रभेचें कडें,
अम्लान प्रतिभा-कळ्या उमलल्या आहेत चोहींकडे.
वोसंडे दुथडी भरूनि सरिता सत्कल्पना पावन
वृत्तींची रसलीन चचळ खगश्रेणी करी क्रीडन.

सारींही जड इंद्रियें न शकती येथें प्रवेशावया
बुद्धिग्राह्य न वाव त्यास, न कळे ठाव प्रमाणत्रया.
वृत्त्यन्तर्गत टाकणें कठिणता, तद्रूपता पावणें,
काव्यानंदरसप्रसग मग हा निस्सग समोगणें !

० ● ●

३३

# वंडवाला

"The Outlaw"—*By Sir Walter Scott.*

"शोभिवत भींवरातीर गभीर नीर वाहतें
अफाटचि हिरवट वन भोंवतें!

"फुलें भरुनि ओंचले गुफुनी स्वकरें त्याचे सर
पुजावा वाटे गौरीहर."

आलापित घाला हे होती मंजुळ गीतस्वर
गडाच्या बसोनि टोकावर.

"प्रफुल्ल तें भींवरातीर गभीर नीर वाहतें
अफाटचि हिरवट वन भोंवतें!

"राज्ञीपद सुखभोग मोहळे नको; टोहळे मनीं–
सल्याच्या सगें वसणें वनीं."

नगर गोपुरें सोडुनि सारें म्हणसी येइन वनीं
अगोदर विचार कर साजणी

दऱ्या आणि दरकुटींत आम्ही क्रमितों दिनयामिनी
यातलें मर्म ममज कामिनी.

वनविहरण मग मनोहारिणी! करणें वदलों तरी
गातसे तेंच गीत सुदरी.

"प्रफुल्ल तें भींवरातीर गभीर नीर वाहतें
अफाटचि हिरवट वन भोंवतें!

"राज्ञीपद सुखभोग सोहळे नको; डोहळे मनीं—
सख्याच्या संगें वसणें वनीं."

"वारु पंचकल्याणी अवलख, करीं शिंग, ह्या खुणा
दाविती उघड करुनि आपणां.

"नृपमृगयावनरक्षक आपण स्वामिभक्त 'वनकरी'
दिसोनी ये हें वरच्यावरी!"

꙳ ꙳ ꙳

वाळे! वनकर शिंग मजेनें वाजे अरुणागमीं
आमुचें घोर निशेच्या तमीं.

तरिहि सखी गातसे, "तीर गंभीर नीर वाहतें
अफाटचि हिरवट वन भोवतें!

"राज्ञीपद सुखभोग सोहळे नको; डोहळे मनीं—
सख्याच्या संगें वसणें वनीं.

"फुलें भरुनि ओंचळे गुफुनी स्वकरें त्यांचे सर
पुजावा वाटे गौरीहर."

"अंगि ऐट; चमकतीं हत्यारें; रक्त करी रंवरंव
भेरिचे झडतां भैरव रव.

"नित्य असें पाहतें; वाटतें शिलेदार फाकडे
असावे खास *हुजुरचे गडे."

꙳ ꙳ ꙳

रणभेरी कर्ण्याचा आता नाद न कर्णीं पडे
रिरंती रात्रींचे वनकिडे;

---

* नृपाचे

संकेतध्वनि तो परिसुनि सरसावुनि भाले करीं
सज्ज मन्मित्र होति झडकरी.

प्यारे, रम्य भीवरातीर तें! खळखळ जळ वाहतें!
प्यारे तें मनोहरवन भोंवतें!

मम स्वामिनी होउनि अपुलें जीवित मज अर्पिणें
कर्म हें अति साहस साजणें!

मत्त यवनकिंकरवर-चित्तीं रति तव, मज सम्प्रतीं
×शहाचा गुन्हेगार बोलती.

नांव गांव ठाव न मुळिं आम्हां, घडीचा न भरंवसा
कळेना अतांहि होइल कसा;

यास्तव अमुचा सुभगसुंदरी! संग न श्रेयस्कर
आम्हांहुनि पिशाच बरवा वर!

निकटविपिनवाटिकेनिकट विस्तृतविटपाच्या तळीं
भेटलीं मिळते टोळींतलीं;

होतों मागें कोण तदा ते आतां आहों कसे
फिकीर न याची आम्हां असे!

* * *

"प्रफुल्ल भिवरातीर, तरीहि, गभीर नीर वाहतें
अफाटचि हिरवट-वन भोंवतें!

"राज्ञीपद सुखभोग सोहळे नको; डोहळे मनीं—
सख्याच्या संगें वसणें वनीं."

---

× बादशहाचा.

## ३४

## बकुल

जीवाचें पहिलेंच फूल फुललें दे. मींहि तें घेतलें
स्वच्छदें दिन दोनचार मग मी तत्सगमीं रगलें.
रूपोन्मादभरागमे मज गमे सौंदर्यलोकेश्वरी—
मी, माझा* सहजाधिकार सुमनस्वीकार हा यापरी!

येताहो करभार घेउनि पुढें अन्य द्रुमाचा थवा.
चाकाटे मम चित्तवृत्ति बघुनी तो थाट त्याचा नवा!
प्रारंभींच निशा वनात अपुला अंधार पाडीतसे,
हातींचें बकुलप्रसून गळलें, केव्हा कळेना कसें!

सूर्याच्या प्रखर प्रभेंत न मुळीं नक्षत्र नेत्रा दिसे.
जाणे चित्त परंतु नित्य गगनीं अस्तित्व त्याचें असे.
चेतोगर्भनभात नित्य तळपे नक्षत्र माझें तसें,
तें मातें अथवा तयास विसरें मी—हें घडावें कसें?

श्वासें देह करी प्रफुल्लित जरी ससर्ग याचा घडे,
चित्ता छद जडे, अनावर मिठी प्राणास याची पडे,
स्फूर्तीच्या उठती अखंड लहरी याच्याच जीवातुन,
ठावें काय मला स्वभावचि असे याचा असा दारुण!

पाहूं वाट किती? 'क्षमस्व' म्हणतें! लाचार माझी स्थिति!
नेत्रीं प्राण उरे, फमूनि वदणें आता परीक्षा किती?
नारीधर्मरहस्यमार्ग नव्हता ठाऊक मातें जसा
नारीचा हृदयस्थभाव कळला नाहीं तुलाही तसा!

---

* नैसर्गिक—जन्मसिद्ध हक्क

• • •

३५

# बुलबुल

*निबिड तिमिर वर मर्मीं संचरे*
*तळीं उष्ण निश्वसनीं वारे,*
*सरणांचे भोंवतीं निखारे,*
*स्थलीं या देख—एकटाच पिंपळ एक-*

*चिरव्यथित तरुजीवज्योति*
*खिन्न तेज वितरिते सभोंतीं,*
*जीर्ण विरळ तत्पर्णावरती*
*दुःख निर्वाण—उमटवी ठसा निज पूर्ण !*

*उपेक्षिलेली पहिली प्रीति*
*रम्योदास तसें एकान्तीं*
*एकस्थल या रौद्र प्रान्तीं*
*तरीही आहे—दरवळूनि परिमळ वाहे-*

*पांडुर मृदु लावण्यद्युतिजल*
*स्थलपरिसर करि ढाळुनि निर्मळ*
*जातिलता कुणि एकच केवळ*
*अदय नियतीनें—लाविली तिथें स्वकरानें-*

*देह तिचा कृश फिकट पांढरा*
*पाहुनि होई जीव घाबरा,*
*वाटे सुटता उडविल वारा*
*पर्णसंभारा—वर भिरभिर सैरावैरा-*

लागो वारा पाउस पाणी,
कुणी धृष्टकर टाको चुरडुनि,
तरि वरि भर ये वोसंडोनी
विकासश्रीला—ती अखड मंडित वाळा.

करुणामय स्वर्ललना कोणी
दिव्याश्रूंचें शिंपुनि पाणी
खचित करी संगोपन जपुनी
असें चित्ताला—वाटतें बघुन वेलीला.

मृदुल धवल नव कुसुमशालिनी
व्रतम्थेस जरि बघतिल नयनीं
सहजोद्‌गारें वदतिल रमणी—
"अगाइग, नवल—ही जाई नच येथील!

"वसंत न करी चैत्रशिंपणें,
"डोलत रविकर न करी येणें,
"झुरे न अंतरिं तरिही तेणें
"अगाइग, नवल—ही जाइ न या महिवरिल!

"साहुनि राहे कडक हिंवाळ्या
"कुजाचा आधार न इजला
"तरी मोगफळोळ सोहळ्या
"फुलाचा भोगी—ही जाई नवला जोगी!"

आश्चर्य एक कीं कुणि अळवेला
पक्षी पडतां नच दृष्टीला
येई तत्सन्निध रात्रीला
प्रेमघायाळ—भटकोनी रानोमाळ!

चाले त्याचा दीर्घ निशेभर
गूढ भावमय मृदु गीतस्वर
जणुं निर्जर वीणाझंकार
कीं बुल्बुल बोले—वनराई मोहुनि डोले !

हृदयिं खवळला शोकसागर
कंठातुनि तरि निघती सुस्वर
येती ऐकुनि होती ते नर
स्वच्छंदीं फंदी—नादाच्या ब्रह्मानंदीं !

पक्षी आपण, प्रीती केली
भासे त्याना वायां गेली
नयनाश्रू ओघळती खालीं
चाखिती धुंद—दुःखाचा परमानंद !

उदास रजनी नच संपावी,
जागर दुःखें हीं सोसावीं,
चित्त तयांचें असेंचि भावी
विलक्षण भारी—विरुताची जादूगारी

दिशा फाकती, तेज उगवतें,
प्रभात होते, गीत थाबतें;
त्यासरसें तें हृदय वितळतें
तेजबवाळीं—रम्याचीं होते होळी !

उत्कटतेनें हृदय फोडितीं
ते स्वैर स्वर रूपा येती;
कोणी म्हणती त्यात उमटती
स्पष्ट साचार—रमणीचे नामोच्चार !

• • •

३६

# एक संवाद

चिमुकल्याच चांदण्या चमकती स्फुर्तिकणाच्या परी—
'होतां लुप्त अनन्तोदरीं!'

वर्षाकालीं जलमय भूतल निर्झरगण तो करी—
'राहे धूळ निदाघीं खरी!'

बालतृणांकुर वेलबुटीची शाल महीची करी—
'विटते निमिषाच्या अवसरीं!'

नाजुक फुल जाईचें भारी वासें भुवना भरी—
'एका श्वासें सुकतें परी!'

सौंदर्याची मूस ओतली नार अशी साजरी—
'होतो रंग फिका लौकरी!'

नवकाव्यें कवि करिती, असती मोत्यांच्या जणुं सरी—
'पाणी क्षणिकचि त्यांचें परी!'

सल्या खोडिसी मला असें का? सान चांदण्याविना
निशेची कांहीं कर कल्पना.

वाळासम हे स्वैर नाचरे ओढे नसते तरी
होती रुक्ष मही मग पुरी!

कोमल मधुरोज्ज्वल भावांची खाण न जरि सुंदरा
जिणें मग दुःसह होतें नरा!

नभाएवढा भानु एकटा पृथ्वीभर कीं तळे
कल्पितां कल्पनाच मावळे !

चंद्र एकटा रम्य; वेष्टितां असंख्य तारांगणीं,
शोभा होते कां ?रे उणी ?

स्तुतिनिंदेचीं अभ्रें येती सामान्याच्या वर,
सत्कवि दोहींच्याही पर.

क्षणभर अमुचें जीवित म्हणशी, असोचि तें क्षणभरी
चमकुनि जाऊं 'कोठें तरी.'

भाग पाडुनि तोडूं जातां काळाचे एकदां,
गोंधळ संपेना मग कदा !

• • •

३७

## यमदूतांस

अखिल जगतांत—आनंद नांदतो मूर्त ! ॥ ध्रु० ॥

स्वर्णरसांकित गिरिशिखरांत,
अरुणरागरंजित मेघांत,
स्निग्ध शांत कीं शशिप्रभेंत,
शब्द होतात—'उठ भाग्य लूट जगतांत !'

प्राप्तस्थिति असतां विपरीत
भग्न जीर्ण निर्जळ विहिरींत
उगवुनि पिंपळ वर येतात
ते म्हणतात—'चल जाऊं उंच नभात!'

कंदुक आपटतां ईर्षेनें
उसळुनि वर येतो वेगानें;
वाढे बल संप्रतिरोधानें,
जिव्हाळा भेटे—मग जीवन कैसें आटे?

'दासोऽहं' हा जपतां मंत्र
लोटुनि गेला गाळ अनन्त,
तृप्तता न झाली सप्राप्त,
दोष कोणाचा?—हा दासोऽहंवृत्तीचा.

परिस्थितीचें कल्पुनि भूत
कंपित होतें दुर्बल चित्त,
निष्क्रियतेच्या मसणवटींत—
शून्य हृदयांत—संचार करी हें भूत!

अशेष भुवनांतिल जीवन तें
वेचुनि घेउनि जावें वरते,
आत्मभूत मग करुनी त्यातें
घावें सकलां—अनुसरुनि जलद-रीतीला!

थेंबें थेंबें बनला सागर,
भूगोलाला कण आधार,
कार्य करावें ल्हान थोर,
निश्चित मिळतें—फळ योग्य काळ येता तें!

चंद्रसूर्य खेळणीं दिलीं खेळाया तेजागळीं,
कुरवाळी हळुवारपणे पण फुले कविमनकळी.

नक्षत्रांची, चटक फुलांची, माळ टपोरी नवी
जरतारी तारांत गुंफुनी केसरास लेववी.

आकाशाचें अंगण झाडुनि अवीट रंगें वरी
विचित्र रेखा लिही लिही ती कळाचतुर सुंदरी.

' बाळ उदासी वणवण भटकुन अपार निष्ठुर जगीं.
असेल थकला,—विचारांत या क्षणभर झाली उगी.

प्रेमासम निज अमर्याद, अक्षय्य, विनिर्मित करी
शुद्ध दुधाची नदी; पाहतो अजुनी जन अंबरीं.

एकाहुनि आगळीं एक, रुचिरत्वें निस्तुळ खरीं,
हृदयाचीं तीं असख्य लेणीं पुढें मुलाच्या करी.

शिशुमन रमवायास करी आयास माय ती असे,
अगाध माया मोठ्यानाही नाचविते भलतसें !

अश्रुमाळ परंतु न तो रिझला, कालोग्य दाट दाटला,
अजाणपण—जाणीव उपजता हृदयक्षोभ आटला.

हृदयाचा अवडंबर अंबर पदर दूर सारुन
विशाळ वक्षीं घट्ट धरी मग फलीम कवटाळुन.

सान्त अनन्ताची मिळणी ती, अगम्य अद्भुत खरी !
मायलेकरें अभिन्न झालीं निजानंदसागरीं.

सृष्टीशीं कवि समरस झाला, प्राण तिचा आतला,
हृत्कमळाचीं तिथ्या कळ्यांही फुलतीं-मिटतीं कला.

वोजड बाह्यालंकाराची, झणत्काराची रति
नुरली, अर्थाकार तयाचीं झाली प्रेमळ माति.

कवीच झाला सृष्टी, सारी सृष्टी झाली कवि,
दिसण्याचें-लपण्याचें गारुड अपूर्व हा भासवी.

आकाशाचा अणू घेउनी त्यांत विश्व दाखवी,
फुंकर घालुनि अजस्र विश्वा क्षणार्धांत लोपवी.

हा हसतां हसते ती, अथवा हा रडता ती रडे,
पहाट फुटते हा उठता हा निजतां झापड पडे.

पूर्णापासुनि ढळलेलें जग जातें पूर्णाकडे,
लागण मोठी, वाट बिकट ती उतार चढ वाकडे.

सृष्टिचक्र हें तोल जाउनी कलतें भलतीकडे,
खडतर मार्गीं दीर्घकाळ तें केव्हा केव्हा अडे.

चक्र सचेतन, सतेज, पण काटाच्या काळ्या पुटें
चक्र काळ हा काळवंडुनी करी कधीं हिंपुटें

उंचवट्यावर केव्हा जाता प्रकाशकण पाहतें
पूर्णत्वाच्या भ्रांतीनें तेथेंच स्वैर नाचतें.

पाणथळीचा खोटा तेजोभास पाहतां कधीं
सैराटपणें भडकुनि तिकडे फसतें चिखलामधीं.

स्नेहाभावें एक्या जागीं फिरूनि घरघर करीं
तेव्हा वाटे मार्ग कठिण आपण हा किति तरी !

जाणिव आणि नेणीव मिळोनी स्वभाव याचा घडे,
तेजोन्मुखता परी न मोडे जरा सदा तें पडे,

सुखाभिलाषें अंग चोरणें, धडपणें धावणें,
लाभालाभा तोलुनि मोजुनि रूढीनें चिकटणें,

या अधमेहुनि त्या अविचारी बुद्धीचे थोरले,
पात निपात अनन्त वरे तेजोभिमुखत्वामुळें.

आनंदाला म्लानपणा नच सौंदर्याला क्षय
स्थलाकडे त्या जाताहे हें विश्वचक्र निर्भय

मार्गाची रुक्षता न याला यत्किंचित जाणवो,
परिश्रमाची प्रचंडता नच अनुत्साह उपजवो

काव्यरसामृत यास्तव कारुण्यानें निर्मुनि कवि
मृदुमधुरोज्वल गीतें गाउनि तेजोबल वाढवी

भूतकाळचें वैभव किंवा सांप्रतची हीनता
प्रकर्षें भावी समोर दावी करी सजग जाणता.

हित जेव्हा कटु बोल बोलुनी, हातमार लावुनी
सृष्टिचक्र हें नीट चालवी वाट उजू दाउनी

भूताधारें समजुनि चाङ्ग काळ नीट, निर्मितो
सोज्ज्वल भविष्यकालाला, कवि धन्य नव्हे काय तो ?

काव्य अगोदर झालें, नंतर झालें जग सुंदर,
रामायण आधीं, मग झाला राम जानकीवर

झाले कवि होतील पुढें, या विशाल कालोदरीं
अघटित घटना घडुन राहिली, कोण कल्पना करी ?

भारतराष्ट्रनभोमुकुरावर, साऱ्या पूर्वेभर,
चिन्हें दिसतीं महाकवीच्या आगमनोत्सवपर.

'राजनिष्ठ' कवि सांप्रतचे ते सर्व चला या मिळा,
या रायाचा मार्ग झाडुनी रचा चारुतर फुलां.

तुमच्या परंपरेंतचि याचा व्हायाचा संभव
जनकत्वाचें पद तें तुमचें, तुमचें तें वैभव !

सृष्टीचे लाडके तुम्ही संलाप तुम्हांशीं करी
प्रलाप किंवा विलाप त्याला म्हणोत कोणी तरी.

"अद्वितीय उत्तम न सर्व तें अधम" म्हणुनि लेखिती
दूषक तुमचे अपूर्व त्यांची तर्काची पद्धति !

विजय असो तुमचा, तुमचे जे दूषक त्यांचा तसा
रानफुलें हीं तुम्हां वाहिलीं, नंदनवनसारसां !



१

## पिकलें पान

पद्य मजला येईल करूं जातां,
त्यांत ओतूं मी काव्य कसें आतां?
अंगीं नुरता निर्माण शक्ति* लेश
कसा यावा भर काव्यकौमुदीस?

स्फूर्तिशक्तीचा होय लुप्त 'मंत्र'
तिथें झालें विकलांग वहन 'यंत्र'
'तंत्र' विस्मरलों, होय मी उदास!
कसा यावा भर काव्यकौमुदीस?

एक नैसर्गिक जन्म सर्वमान्य,
अन्य होतों संस्कारकर्मजन्य.×
छटा यांच्या होतां न एकजीव
काव्यसौंदर्यी भासते उणीव!

काव्यदेवी-देउळीं-गर्भभागीं+
शिरूं शकलों मी ना कधीं अभागी!

---

* Creative Power. × Art. +गाभारा.

मुखश्रीचें, एकान्त-दर्शनाचें
सुख स्वप्नांतहि तें न मिळायाचें

भाग्य नसतां मज रसिकरंजनाचें
कसे काढूं उद्‌गार धन्यतेचे ?
कुणा सांगूं या कर्मकहाणीला ?
मला वाटे हा जन्म फुकट गेला !

• • •

२

## गाविलगड

सातपुडा जवळींच बोडखे वर डोंगर घाट,
खालते जंगल मोकाट.

इतस्तता पसरुनी भरारा उंचविती माथे
आक्रमशील सकळ येथें.

पहा वृक्ष-वेली कीं, खग-पशु-कीटकगण सारा
सदा * संनद्ध प्रतिकारा.

मुक्तछंदलीलेचे निष्ठुर शासनविधिलेख
*निसर्गीं जीवनींहि एक.*

मंगलोग्र शक्तींचा गिरिवर सदा सिद्ध मेळा
जीवनमरणाच्या खेळा.

* सज्ज

विरुद्धेंहि एकत्र नादवी सत्तेचा व्याप
भयानक तिचें आद्यरूप.

जीवसृष्टि जीवनांत तेंची रूपविंब्र नाचे
जणूं तें चलत् चित्र तीचें.

द्वितीय पुरुप न जाणिव येथे प्रथमाचा थाट
जिवाचा तो पहिला पाठ.

द्वितीयतेची जाणिव मुकुरित होता तें ज्ञान
सृष्टिचें पहिलें बलिदान.

समर्थीत तद्विकास व्हावा विस्तारित अजुनी
युगें किति जातिल कीं निघुनी !

साध्य न हें तोंवरी अवश्यचि जीवितरणकर्म
घोर तरि तो मानवधर्म

विश्वपुरुप हा विश्वहितास्तव त्रिगुणात्मक कुंडीं
पाशवी-अंश-हवन मांडी.

त्याग आणि उत्सर्ग समुत्कट उद्दीपित करिती
महत्तम अंतर्हित शक्ति.

ती आत्मोन्नति, संस्कृति ती, ती मानवता विहित
अल्पतर तामसपण जींत.

संस्कारशील संस्कृति वदशी व सर्व भ्रममूल
मना ! मग तूंहि एक भूल.

तर्कवितर्कात्मक बुद्धीचें अति अस्थिर तेज
बुद्धिची श्रद्धा ही शेज. *

जाणुं शके ती शक्ति याळन्या मात्र आकृतीची.
न जाणें शाद्वल × हरळीची.

प्रचंड चाले स्थूलान्तरिं तो व्यापार न विदित
मनुजमतिगति परिमित अमित

ज्ञान सरुनि सस्कार उरे तें तेवढेंच बुझें
वाकी भारभूत ओझें

समवाय संस्कृति संस्काराचा तदनुसार शील
जिणें तिजविण वाव्कळ खूळ

* * *

क्षितिजाच्या ककणीं लखत लघु तारा जणुं विमल
वेलिच्या पालवींत फूल.

तसें गांव एक हें नदीच्या वाकणात राहे
पाणी बारमास वाहे.

सिंधु व गिरिचें अखंड पुरवी नवजीवन तीस
खव्याळे म्हणुनि समुल्हास.

कडेवर टेकटा सताचें रम्य स्थळ परम
साभिमुख भैरव वलभाम.

खडा असे सन्मुख + 'गाविलगड' साहत तप करिता
आतप हिम-वर्षा-वाता

---

* विसाव्याचें ठिकाण × हिरव्या + एक डोंगरी किल्ला.

दिसे अस्थिरपंजर केवळ तो उरे प्राण कंठीं
आर्त गतवैभवार्थ पोटीं.

पूर नदीचे येती पायीं लोटांगण घेती
निरामय मळ टाकुनि होती.

रिघ-निघ चाले, उधळण चाले हळदकुंकवाची
गर्दी होते नवसांची.

देती नेणत सद्भावांचे दृढतर संस्कार
संतांचे ते जयजयकार.

[ अपूर्ण ]

३

## दोन ‘ मी ’

१

मज सर्वांज्ञा कळे न त्याला एक शिवी मी हासडतों,
‘शतपातां’* चा कलाभिज्ञ मीं आग तयावर पाखडतों.

डोकें लढवुनि पैका कमवी कां मज म्हणतां ‘पोटभरू’?
खाल तुपाशीं आणि उपाशीं काय एकटा मीच मरूं ?

‘माल गधोंका अक्लमदका खुराक’ हें आपण करितां,
गाल्या मजला का देता हें सत्यव्रत मीं आचरिता ?

---

* मोरोपंतांचें इसकाकीय कथन.

पुढें पुढें ते जाती त्याना टाग ओढुनी पाडितसे,
पुरुषार्थाची, कृतार्थतेचा सिद्धि याविना अन्य नसे !

मान तुम्हांस मतें असावीं, नकोत मज कांहीं काय ?
'गाड मनीं तीं' मला सागता, घोर होतसे अन्याय !

"हिंदुस्थाना रशिया बनवा"—महायुद्ध सांगे वर्म
'प्रथम भेद मग छेद भयकर' हाच आमचा कुळधर्म ! *

२

विशालतेतिल भिन्नत्वांतिल एकसूत्रपण अव्यग
कळोनि आहे आणायाचें वर्तनांत तें सर्वांग.

सुधारणा पाहता आजची आपणास हें स्पष्ट दिसे
पाशवता परिपूर्ण आतली उफाळूनि वर येत असे

अणु परिमाणू रेणु आणि तिसेणूवर वर्चस्व दिसे
हा बुद्धीचा विकास, पण तो मानवतेचा खास नसे !

बुद्धीचा तर विकास येतो राक्षसातही आढळुन
मनुष्यत्व राक्षसास देणें आर्यधर्म * हा सनातन

उत्पत्ति, स्थिति तसाच लय हा सृष्टीचा क्रममार्ग असे
महन्मगला चिच्छक्तीचा हा तर परमोल्हास दिसे

योग बुद्धिचा मानवतेशीं 'बुद्धियोग' निस्वार्थपर
शिकोनि टाळू हा आताचा क्रूर तामसी सहार

---

* मूळ स्वभाव

३

सस्कृति म्हणजे जीवनसरणी वेगवेगळ्या त्या असती
विशेषता तींतली आपली दक्षपणे या रक्षू ती.

सस्कृति परकायाची करणें आत्मसात हें शक्य नसे,
अगळगट करु नका तिच्याशीं त्यात आपला घात असे

जीवन-सजीवनी त्याग ही राष्ट्र असो संपन्न नसो
ना तरि त्याचा विनाश मानिं हें अक्षयतेचें तत्त्व ठसो.

देश असो माझा मी त्याचा सर्वस्वार्पण करीन मी
निर्वाणींही कधीं न होइन देशाचा बेमानहरामी.

भारतास भूषण विश्वाचें करण्याचा निर्धार धरू
देशहितास्तव जगू, नाहिं तर प्राणाचा उत्सर्ग करू !

• • •

४

## स्वैर गीत

अयि स्वैरते ! गाइ गीत तू, मतवाली× तू, तू अतुला,
विषयाची निर्मात्री ती तू, विषय कोणता देउ तुला ?

ஐ ஐ ஐ

" स्वैर पांखरें विचरति वरती, स्वैर फिरे वनवायु वरी;
कृष्ण मेघमडळ प्रकाशुनि मुक्त तेज सचार करी.

× स्वच्छदी.

स्वतंत्रतेचा अर्णव फेकी स्वतंत्र लहरींवर लहरी
जनसमदों स्नात करोनी सौभाग्याचा + सेस भरी

पूर लोटला उत्साहाचा उसळत महितळ सकळ भरीं,
ऊठ, होय जागृत बसलासी काय उगा तू स्वस्थ घरीं ?

प्रतिभेच्या आरशात पडते ✿ निसर्गछाया मनोहर,
वाङ्मयतप कर, प्रसन्न होइल प्रतिभादेवी निरंतर

भेसुरतेला साग मराठा भ्याला केव्हा काय तरा ?
वाङ्मयगंगा खालीं नेउनि सहस्रायुधें देइ करीं

प्रणयपकजासवें खेळणें आता तरि तू पुरे करीं
नियमाचें परिपालन सरलें जाय कराया मुलुखगिरी

यशोगान-दुंदुभी नादवुनि नेई त्याला दिगंतरीं
ज्योत जागती करीं धरोनी दीपस्तंभ उभारिं वरी ! ”

✿ ✿ ✿

वाह स्वैरते ! स्वैर धावसी धावू मागें कोठवरी ?
दमलों ! ‘ लेखन-कामाठी ’ मी आता मारी पुरे करीं

• • •

---

+ मळवट ✿ स्वभाव

५

# भारतीय जीवन

१

जीवमात्रामधें राहे एक शक्ति अपार्थिव
जड सूक्ष्मेंद्रियद्वारा हो तिचा व्यक्त संभव *

क्रियाशक्तिस्वरूपानें अनेकविध जो घडे—
व्यवहार तयालागीं 'कर्म' ही अभिधा पडे.

व्यक्तिकर्मप्रवाहाचें वाहणें तेंच 'जीवन'
स्थलीं एकींच हो त्याचें जन्म आणि विसर्जन.

'चैतन्य' म्हणती त्यातें सर्व विश्वास निर्मुनी
स्वभावचि असे त्याचा रहावें त्यात व्यापुनी

सर्वव्यापक तत्त्वा या नावें बहुत ठेविती—
'जगज्ज्योति' 'अंतरात्मा' 'जगज्जीवन' बोलती

विभूती त्यातुनी येती, जाती आम्हास देउन
ज्ञानतेजें समायुक्त विकासमय जीवन.

भारताचा असे मोठा विस्तार तरि आपणा
महाराष्ट्रप्रतीकानें× करूं येतेच अर्चना

प्रतिमापूजनें होतीं ईश्वराप्रति अर्पण
महाराष्ट्रभिपानें+ हो भारताचेंच पूजन

---

* अस्तित्व × प्रतिमा +रूपानें

विपन्नकाळीं देशाच्या अग्रभागीं सदा स्थित
राहिला हा महाराष्ट्र, आज राहिल निश्चित.

२

एकान्तात महत्कार्यें स्फूर्ति-मूर्तीस पावती
राष्ट्रोदय नवे होती सूज्ञ सर्वत्र बोलती.

एकान्तात वसूं जाता अन्य सकल्प सोडुनी
विचारांचें, विकारांचें काहूर उठतें मनीं.

विवेकभ्रष्ट तत्त्वाचा वडिवार दिवादती;
तत्त्वें तीं असतीं कोणासाठीं हें तें न पाहती !

व्यावहारिक तत्त्वें तीं सापेक्ष असतीं सदा,
भिन्नावस्थेंत कामाला तेंच तें ये न सर्वदा.

देशकार्यीं तत्परातें निंदिती उत्तरोत्तर
कृतीच्या शून्य नांवानें शब्दगुड घरोघर !

स्वदेशाच्या गौरवांत आपला होय गौरव
यातना, हाल जे त्याचे, आपला तोच रौरव !

शक्तीचें वसतिस्थान अंतःकरण केवळ
पवित्र जीवनाधारें कर्में होतात सोज्ज्वळ.

सुखाचीं वर्णित स्वप्नें भ्रान्त चित्तें मदोदित
सत्यसृष्टींत येती का ? व्हावें कार्यास उद्यत ! ×

---

× आरंभ करणें.

स्वतंत्राची देशवाणी देशवैभव गर्जतें
पराधीनें स्वदेशाचें रचावें स्तोत्र कोणतें ?

जाणत्यानें सदा व्हावें यत्नसाहसतत्पर
सिद्धिदाता होत आला सत्यसंकल्प ईश्वर !

शार्ङ्गिच्या चालका रामा ! पुरवी मनकामना
' सत्यं-शिवं-सुंदरम् '— दे आनंदवनभूवना ! +



तें तत्त्व निर्णय करी जड शोधनानें,
संशोधिला सकलही व्यवहार त्यानें,
अध्यात्म मानस तथा व्यवहारसार
एकत्र यात मजला दिसतो विचार.

यानेंच शुद्रतर हा व्यवहार केला
यानेंच व्यापकपणा दिधला तुम्हाला
पूर्वेतिहास पढता पटलें मनाला
देईल वैभव पुन्हा नवभारताला !

• • •

७

## आठवण

१

ऊन उतरलें होतें, वारा पडला होता वंदी
दिशादिशाच्या नेत्रीं भरली होती मादक धुंदी

नेती जिकडे पाय मागुनी शरीर तिकडे जातें
शून्यत्वाचा अमाप उघडे डोळे पाहत होते.

मदावत पाउलें चाललीं खिन्न मनाच्या मागें
तीव्र भाव हो जसा मदतर अवास्तविक निस्तारें.

मूर्तिमंत रूक्षता वागरे अफाट त्या मैदानीं
उडता जीव न दिसला एकहि ध्वनि नच पडला कानीं !

रिता एकटेपणा जगीं या भीषणतर भारी
साक्षात्कारीं अनुभविली मी मारकता ती सारी !

२

काळीं तरुराजी क्षितिजावर दिसली त्या अवकाळीं
हरिणीच्या नेत्रांतिल जणुं का काजळरेषा काळी !

उडतीं दुनिया दिसू लागली रानीं गजबज झाली
स्वर्णरसानें सारवलेलीं शेतें पिवळीं पिवळीं.

वरतुन वाराही सुटला मुक्त खगासम भिरभिरला.
झाडेंझुडपें डोलु लागलीं उत्सव तृणपर्णी भरला.

वाऱ्यावरुनी अवचित आल्या गीतासुधेच्या धारा
चित्तमोर नाचला आपला उघडुनि पूर्ण पिसारा.

स्त्रीकंठांतिल होते ध्वनि ते भाव न ये निर्धारा
शेलेचा चंडोल गाय कीं गिरिधर नागर मीरा !

ओसरतें हो गीत चाललें अपूर्व त्यातिल गोडी
* मिळे नृत्यगतिशीलांची त्या संगीताला जोडी.

रूपराशि उर्वशी वाटलें स्वर्गातिल सुकुमारा
भरुनि हातीं शुद्ध चांदणें करीत होती मारा !

होतां आळव अंत:करणीं ते गीतस्वर भरती
हृदय नाचतें नृत्यगतीच्या अविरत तालावरती.

• • •

---

* ते गीतध्वनि नृत्यगीतदील होते.

८

## एक दृश्य

विदर्भांत डोंगरांत आहे गांव नांव बुलढाणें
वनलक्ष्मीच्या शृंगाराचें एक अमोलिक लेणें !

गांवाच्या उत्तरेस आहे जवळचि डोंगर मोठा
द्वारपाळ हा कडा पहारा देउनि रक्षी वाटा !

तिकडे वस्तीपासुनि लागे उतरण कांहीं थोडी
चढण लागते पुढें जराशी जाया उच पहाडी.

त्या उंचावर आहे मोठा एक कडा तुटलेला
दृष्टि देखणी* एकवटे ती शोभा निरखायाला

पायांखालीं उंच कड्याच्या गोलाकार दरी ती
पश्चिमेस मुख करुनि दूरवर घसरत गेली होती.

सायंकाळीं एके दिवशीं नित्याच्या परिपाठीं.
सहज निघालों व्यवसायाच्या श्रमपरिहारासाठीं.

त्या रमणीय स्थळीं पातलों, जाउनि वरतीं बसलों
सृष्टीचें तें दृश्य पाहतां विसरुनि मज मी गेलों !

सूर्यबिंब सारखें धावतें अस्तगिरीच्या संगा
निजैश्वर्यरंगें अभिषेकी ज्योतिर्मय महिलिंगा ! +

---

* पाहणारी. + पृथ्वीरूपी शिवलिंग.

रविबिंबाचें रूप घेउनी वाटे कीं, अनुरागें
नील नभाचीं, धवल घनाचीं राजित केलीं अंगें !

रक्तवर्ण पर्वतीं रंगीं त्या वस्तुजात रंगे
शुचिर्भूतही तसाच होई मी त्यांच्या अनुषंगें.

दृष्टिपथीं ये एकाएकीं दरीवरिल आकाशीं
ताम्रछटामिश्रित रंगाचा एक कृष्ण पक्षी.

आला कोठुनि कळलें नाहीं निज गति कुंठित करुनी—
पक्षद्वय निज पसरुनि सुस्थिर राहे निश्चल गगनीं !

दृष्टि करुनि एकाग्र नेहटुनि पाहे रविबिंबासी
व्रताचरण करितसे उग्रतर काय विहग वनवासी ?

चलित * स्थिति होता त्याची तो एक घेउनी गिरकी
तीव्र चिरत्कारें स्थिर होउनि विंब पुन्हा अवलोकी.

नवलाचें तें दृश्य पाहतां वेध लागला चित्ता
चाहूल नसतां एकाएकीं प्राप्त होय तन्मयता !

तन्मयता ती चिंत्य वस्तुच्या खोल अंतरीं शिरते
बहिरंगाच्या वरते नुसते फेरे घालित नसते !

मला वाटलें, क्षेप घेउनी उच्च नभाच्या भागीं
पक्षी लोपुनि खरोखर स्थिर झालों त्याचे जागीं !

पृथ्वीवर जड शरीर सोडुनि झालों गगनविहारी
त्या पक्षासम करूं लागलों त्याची अनुकृति सारी.

---

* तोल गेला असतां.

व्हावें स्थिर मग गिरकी घ्यावा, रक्तबिंद लक्षावें,
असें चालतें नित्य वळ तें नाहीं मजला ठावें !

अज्ञातातुनि पक्षी आला, गेला, माहि निवालों
पद न लागता भूमीला मी वरवर चालत आलों !

शरीरात असतीं तत्त्वें या जीं जाणिव घेवोनी
अंतराळमार्गानें जाती त्वरित इच्छिल्या स्थानीं ?

विचार करिता प्रश्न सुटेना, हुरहुर चित्तीं लागे
झोपेंतहि तेजाळ दृश्य तें लागे माझ्या मागें !

• • •

## ९

## प्रीति

अवश्य कर प्रीति तू सहज धर्म हा वागतो
परी समज अंतरीं विकृत चालता मार्ग तो !
परस्परिं न राहती समसमान आकर्षणें
तरी विरस मानसीं नियम चालती धर्षणें !

असें कुटिल प्रीति जी श्रुतिमनोहरा रागिणी
दिसो रुचिर ती असे गरलधारिणी नागिणी
असे द्विविध प्रीति ती मलिनभोगकामातुरा,
तशीच दुसरी उपेक्षम असे महामंगला !

अशीच कर प्रीति जी सुपथदीपिका जीवनीं
गृहीं सुखद होतसे तशिच शृंखलाबंधनीं× !
समग्र पुरुषार्थ दे सुयश-कीर्ति, दे श्रेयसें
तसें शिकवि उज्ज्वलास्तव तुला मरावें कसें !

• • •

१०

## रूपमुग्धा

सौंदर्याचा लीलासागर लागे हालायाला
निज लावण्योदक देखाने—इच्छा झाली त्याला.

प्रतिबिंबित आपल्या पहावी सृष्टीची व्यभिशोभा
प्रबल ओढ ही रूपसागरा त्या चढवी प्रक्षोभा.

स्वयप्रभा अवलोकायाची जरि आवड हो त्याला
'दुर्जे' करुनि लागतें पहानें त्याही अप्रतिमाला !

* * *

पुढें आरसा ठेवुनि बसली नवबाला एकान्तीं
प्रकाश पाडित होत्या तेथें उज्ज्वल दीपज्योति

असामान्य सौंदर्य धरसें तें त्या जग हें वाखाणी
देखायातें इच्छित होती रूपगुणाची खाणी

× पैदेंत.

स्वच्छ आरशाच्या भूमीवर प्रतिमा बिंबित झाली
लावण्याच्या कोवळिकेवर पोरचि मोहुनि गेली!

मन्त्रबळें मान्त्रिकें करावें मन्त्रबद्ध इतराला
तो संमोहनमंत्र उलटला, स्वयं बांधला गेला!

मूर्ति मनीं संकल्पें होतीं काय उभी, अभिरामें?
हृदयाचें सिंहासन बघता दिसतें शुद्ध रिकामें!

वस्तूच्या निरपेक्ष असें जें भावरूप सौंदर्य
काय चालले असें तयाचें हें तव चिंतनकार्य?

* करी कल्पना सौंदर्याचा सुहास्य जें अव्याज
सुरम्यतेचा तेंच चढवितें त्या वस्तूवरि साज

तिरस्कार कधिं प्रेम, रुष्टता कधिं आकुलता, कोप
उमटुनि ते अनुरूप चालती अंगाचे विक्षेप

ओष्ठ, भ्रू, कर कधीं मोडिशी, स्थिर कधिं चंचल दृष्टि
क्षणोक्षणीं निर्मिशी विलक्षण नूतन अभिनयसृष्टि!

रंगविकाराचें उमटुनि हो तव सुतनूवरि मेळ
सगें त्याच्या खेळतेस का तू हा अद्भुत खेळ?

नेत्रांतिल तेजाची कलिका इकडे तिकडे नाचे
जावभाव एकत्र होउनी त्या त्या ठायीं साचे.

सभोंवार तेजाचा निर्मळ चादर पसरत जाते
जाव उडा घे त्या मृदु शय्येवरती लोळायातें.

---

* सौंदर्याच्या कल्पनेचें हास्य म्हणनच रमणीयता तें ज्या ज्या वस्तूवर पडतें, ती ती वस्तु रमणीय दिसते

प्रसन्नतेचा प्रशान्त शीतल तेजोनिधि कोंदाटे
जीव सारखा पोहत डुंबत राहो त्यातचि वाटे!

सूक्ष्म नेत्रकिरणांतें घेउनि विणलें वस्त्र नवीन
"मोल काय तें सांग"—पुसाया सौदागर तरि कोण?

सौंदर्याच्या या स्फुरणातें पाहुनि प्रत्यक्षातें
साहित्यांतिल रसभावाचें व्यर्थ प्रदर्शन होतें!

फुटे आरसा, स्वप्न उडालें स्पष्ट वाजतां 'खट्'
मुक्तांगावर स्खलित पदर घे सावरूनि ती घट्ट!

सभोंवार भयचकित लोचनें पहात उठली पट्कन्
+रागात्मक भावाचे तुटले नाजुक सूत्रहि तट्कन्!

जन्मा येउनि एकवेळ हा पर्वकाळ साधावा
पूर्णोदय 'नारीतत्त्वाचा' भाग्यें अवलोकावा!

रसास्वादनाचित विषयाचें केवळ करितां येतें—
स्वसंवेद्य आस्वादन; तेथें वाचा स्तंभित होते!



+ काव्यमय किंवा गीताला योग्य असा भाव.

## ११

# प्रतिमाभंग

ज्यानीं भारतपुण्यभूमिवरतीं फोडोनिया डोंगर
लेणीं निर्मुनि दाविलें निज कलानैपुण्य लोकोत्तर;
वज्रप्राय कठोर भेदुनि महायत्नें शिलाप्रस्तर
तो कैलास अगम्य आणुनि दिला आम्हास पृथ्वीवर !

त्यानीं मूर्ति अनेक निर्मुनि नव्या रंगावली रेखिल्या,
त्यांच्या पाहुनि त्या कलाकृति जगें सोत्कंठ वाखाणिल्या;
हा नेत्रोत्सव पाहण्यास जमले ते तृप्त झाले जन
धीरोदात्त विमुग्ध, ते परतले, तेथील सपादुन.

त्यानीं मूर्ति अनेक यत्न करुनी होत्या श्रमें निर्मिल्या
गर्वोन्माद भरात नीच यवनें येवोनि त्या भंगिल्या !
हा विध्वंस समोर एक, दुसरे ज्यापिही चालता—
राष्ट्रात्मा खवळोनि जाय न कसा विच्छेद हे साहता !

प्रज्ञावंत विचारशील असती आम्हात जे सुस्थित
साक्षेपें म्हणती समस्त विसरा ही दुष्टता सांप्रत
सारे यद्यपि शान्तिपाठ पढतों सप्रेम येथें सदा
आहो मानव हें कसें विसरता आम्हास येतें, वदा ?

त्या सन्मूर्तिवरी मनोविहग हा फेरे असे घालित
तें अत्यंत सखोल वाच्य करिता येतें कसें ह्रद्गत ?
कोणा निष्ठुर येडगा जरि तिला भंगोनि टाकीतसे
या निर्माल्य जगात राहुनि अशा, त्यानें जगावें कसें !

• • •

# पहिल्या ओळींची सूचि

फुलांची ओंजळ

• • ०